प्रल्हाद केशव अत्रे

# वंदे भारतम्

तीन अंकी

नाटक

किंमत २ रुपये

## आरंभीं—

नवीन घटनेच्या आगमनानें गेल्या पांचसहा महिन्यांच्या काळांत सर्व देशांत आणि विशेषतः या प्रांतांत राजकीय जीवनाला जीं आंदोलनें मिळालीं त्यांच्या हालत्या पार्श्वभूमीवर हिंदुसमाजांतील आज उपस्थित झालेल्या कांहीं धार्मिक व सामाजिक प्रश्नांचीं रेषात्मक व्यंगचित्रें या नाटकांत रंगविण्याचा प्रयत्न केला आहे. नाटकांत चितारलेल्या कांहीं व्यक्तींचे तोंडवळे क्वचित् कोणाला परिचयाचे वाटले तरी हें साम्य त्या त्या व्यक्तींच्या सार्वजनिक कार्यस्वरूपांत होणाऱ्या दर्शनापुरतेंच आहे हें अवश्य लक्षांत घ्यावें. शिवाय विशिष्ट परिस्थितीमध्यें निर्माण झालेल्या मतप्रणालींचें प्रतिनिधित्व दर्शविणारीं पात्रें रंगविलेलीं असूनहि त्यांच्या स्वभावचित्रणांत निर्भेळपणापेक्षां मिश्रणच पुष्कळ आढळून येईल. नाटकाचा काळ हा हंगामी मंत्रिमंडळाच्या प्रतिष्ठापनेपासून तों त्याच्या विसर्जनापर्यंत अदमासें तीन महिन्यांचा आहे. नाटकांत उल्लेखिलेल्या राजकीय व धार्मिक पक्षांची घटना व नांवें काल्पनिकच असल्यानें त्यांच्याशीं सादृश्य असणाऱ्या सत्यसृष्टींतील पक्षाशीं त्यांचा तसा कांहींच संबंध नाहीं. विषयाच्या ताजेपणामुळें नाटकांतला बराचसा मालमसाला आज खमंग व गरमागरम वाटला, तरी ही तात्कालिक वाफ कांहीं काळानें घनीभूत होण्याचा संभव असल्याची लेखकाला जाणीव आहे. पण या तात्कालिक महत्त्वाच्या रेघोट्यांतून दीर्घजीवि सामाजिक प्रवृत्तिंचा आलेख व्यक्त होणार नाहीं असा कोणीं निर्वाळा द्यावा!

१३ आक्टोबर १९३७ प्रल्हाद केशव अत्रे

---

या नाटकाची दुसरी आवृत्ति दहा वर्षांनीं निघत असली तरी त्यांतला कथाविषय अद्यापिहि पूर्वीइतकाच ताजा आहे. गेल्या दहा वर्षांमध्यें जनतेनें या नाटकाचें जें प्रचंड कौतुक केलें त्याबद्दल मी तिचा ऋणी आहें.

१३ सप्टेंबर १९४७ प्रल्हाद केशव अत्रे

या नाटकाचा पहिला प्रयोग शनिवार, दि. १६ ऑक्टोबर १९३७ दिनीं रात्रौ बालमोहन नाटक मंडळीनें पुणें येथें विजयानंद नाट्यमंदिरांत करून दाखविला.

---

या नाटकाच्या प्रयोगाचे मोनॉपली हक्क ग्रंथकाराकडे आहेत.

---

या नाटकाच्या पुढील आवृत्तीसंबंधींचे सर्व हक्क सौ. सुधा अत्रे, 'ज्योतिर्मंदिर', माडीवाले कॉलनी पुणें २ यांच्या ताब्यांत आहेत.

## पात्रें :

( प्रवेशाच्या अनुक्रमानें )

अलका

सदानंद

त्रिभुवन

माणिक

सर गुरुनाथ

सोमेश्वर

दिलीप

कादरखान

कल्याण

जयंती

स्वयंसेवक, स्वयंसेविका, पोलीस, बातमीदार व इतर लोक.

---

**काळ** : गेल्या पांचसहा महिन्यांतला. संबंध कथाभाग तीन महिन्यांत घडला असें समजावें.

**स्थळ** : पुणें.

---

# वंदे भारतम्

## १

सर गुरुनाथ यांचा दिवाणखाना. बॅ. सदानंद व सर गुरुनाथांची मुलगी अलका यांचें ' बॉल नृत्य ' चाललेलें आहे. बाजूला एका टेबलावर ग्रामाफोन ठेवलेला असून त्यावर नृत्यसंगीताची तबकडी वाजत आहे. बॅरिस्टर सदानंद हा एक मराठा तरुण असून दोन तीन वर्षांपूर्वी इंग्लडहून बॅरिस्टर होऊन परत आलेला असतो. कोर्टांत काम नसल्यानें तो राजकारणांत जातीय तत्त्वांचा अवलंब करून शिरलेला असतो. तो स्वतःला ' मराठा लीग'चा पुढारी समजतो. सर गुरुनाथांची कन्या अलका ही लंडन विश्वविद्यालयाची पदवी घेऊन थोड्याच दिवसांपूर्वी आलेली असते. या दोघांचें इकडे नृत्य चाललें असतां बाजूला एका कोचावर त्रिभुवन व माणिक बसलेलीं असतात. त्रिभुवनच्या हातांत व्हिस्कीचा ग्लास असून तो मधून मधून पीत आहे. त्रिभुवन हा पूर्वी सैन्यांत कॅप्टनच्या हुद्द्यावर होता असें म्हणतात. म्हणजे तोच तसें लोकांना सांगत असे. कांहीं कारणांमुळें त्यानें ती नोकरी सोडली ( किंवा त्याला सोडावी लागली ! ) व त्यानंतर तो धर्मांतरवादी अस्पृश्यसमाजाचा पुढारी झालेला असतो. माणिक ही एक ख्रिस्ती तरुणी असून धर्मांतर केल्यानंतर तिच्याशीं लग्न करण्याचें त्रिभुवननें तिला वचन दिलेलें असतें. कांहीं वेळानें नृत्य संपतें व सारे टाळ्या वाजावितात.

**अलका** : ( कोचावर बसून ) दमलें बाई—

**सदानंद** : ( बाजूच्या एका ठेवलेल्या व्हिस्कीच्या बाटलींतून थोडीशी व्हिस्की पेल्यांत ओततो व त्यांत सोडा मिसळीत ) इतक्या दिवसानं आज अगदीं मजा आली बुवा ! या निवडणुकीच्या भानगडींत स्वतःकडे लक्ष्य द्यायला देखील फुरसत नव्हती ! ( पेला उंच धरून ) टु युवर हेल्थ अलका ! ( अलका हंसून मानेनें स्वीकार करते. ) चीरिओ, कॅप्टनसाब—चीरिओ, माणिक !

[ पितो.

**त्रिभुवन** : चीरिओ !

[ पितो.

**सदानंद** : हं, अलका, उठ, लेट अस् हॅव्ह वॉल्ट्झ् नाव् !

**अलका** : आतां मी खरंच दमलें—

**सदानंद** : इतक्यांतच ? आतां तर कुठं पांचवं 'राऊंड' संपलं !

**अलका** : सकाळपासून मी काम करतें आहें एकटी ! उभं राहून राहून माझी पाठ अगदीं भरून आली आहे—आणि आपणच एकट्यांनीं नाचण्यांत काय अर्थ आहे ! हे दोघे तर आपले स्वस्थच बसले आहेत ! ( त्रिभुवनला ) असं हो काय त्रिभुवन करतां ? ( माणिकला ) ऊठ ना माणिक ! आज माझा वाढदिवस नसता तर मीं तुम्हांला आग्रह केला नसता !

**सदानंद** : उठा कीं कॅप्टनसाहेब ! तुम्हीं तर आल्यापासून नुसता पिण्याचाच सपाटा चालविला आहे—

**त्रिभुवन** : मला नाचतां येत नाहीं म्हणून मी पितों आहें ! आणि आतां पितों आहें म्हणून नाचतां येणं शक्य नाहीं !

**माणिक** : कांहीं नाहीं—आणखी प्याले म्हणजे हे आपोआप एकटेच नाचायला लागतील—

**त्रिभुवन** : हिअर्स टु युवर हेल्थ अलका !

[ पितो.

**माणिक** : आतां पुरें बरं का—

**त्रिभुवन** : आज अलकाचा वाढदिवस आहे अन् पुरे काय? आज आपण जल्लोष करणार!

**सदानंद** : काय हो, कुठल्याशा त्या लढाईच्या वेळेला तुम्हीं फ्रान्सला गेला होतां ना? चांगलें वर्ष दोन वर्ष होतां तुम्हीं तिथं आणि नाचतां कसं येत नाहीं तुम्हांला?

**त्रिभुवन** : म्हटलं तिथं मी लढाईला गेलों होतों—नाचायला नाहीं! थोडं फार शिकलों होतों नाचायला—नाहीं असं नाहीं! पण तें आतां विसरून गेलों. किती वर्षं झालीं त्याला! तुमचं बरोबर आहे—तुम्हीं बॅरिस्टर व्हायला गेलां होतां इंग्लंडला! बॅरिस्टर व्हायचं म्हणजे काय! खूप खायचं—चिक्कार प्यायचं—आणि खच्चून नाचायचं!

**सदानंद** : तुम्ही आमच्या धंद्याची बदनामी करीत आहांत! करूं कां नुकसानभरपाईची फिर्याद?

**त्रिभुवन** : कां? प्रॅक्टिस नाहीं म्हणून पैसे उकळण्याची ही युक्ति काढतां आहांत वाटतं?

**अलका** : काय हो त्रिभुवन, तुम्ही तर आतां धर्मांतर करून ख्रिश्चन होणार आहांत ना? मग ख्रिस्ती समाजांत सभ्यपणानं मिरवायचं म्हणजे तुम्हांला हें नाचण्याचं तंत्र नीट नको का यायला?

**सदानंद** : काय हो माणिकबाई, तुम्ही त्यांना ही विद्या अजून चांगलीशी शिकविलेली दिसत नाहीं!

**माणिक** : आमच्या धर्मविषयीं तुमची भलतीच कल्पना झालेली दिसते आहे. ख्रिस्ती व्हायचं म्हणजे नाचतां आलं पाहिजे असं कुणी सांगितलं हो तुम्हांला?

**सदानंद** : नाहीं का? मला वाटलं कीं ख्रिस्ती व्हायचं म्हणजे सहा दिवस मनसोक्त नाचरंग करायचे व सातव्या दिवशीं देवळांत जाऊन प्रार्थना करायची अन् आठवड्यांत केलेलं सारं पाप निस्तारून टाकायचं—

**त्रिभुवन** : आतां मीं ख्रिस्ती व्हायचं ठरवलंच आहे म्हणून! बाकी तें तुमचं मराठी बायबल वाचायचं म्हटलं कीं माझ्या अंगावर कांटा उभा रहातो! दाखवूं आब्राहामाची वंशावळी म्हणून! (गंभीरपणें उभे राहून) आब्राहामाला

इसहाक हा पुत्र झाला–इसहाकला याकोब–याकोबाला यहुदा–यहुदाला पेरेस–पेरेसाला हेस्रीन–नहशोनला सल्मोन–सल्मोनाला ओबेदा—

**सदानंद** : ए मेलों–थांबव—

**माणिक** : हा काय फाजिलपणा ! पवित्रशास्त्र म्हणजे कांहीं पाढे परवचा नाहीं असा वाटेल तेव्हां म्हणून दाखवायला !

**त्रिभुवन** : छे, छे, त्या भयंकर वंशावळीची आटवण झाली कीं मानवजात निर्वंश व्हावी असं वाटूं लागतं ! बायबल न वाचतां ख्रिस्ती होण्याचा कांहीं मार्ग असेल तर सांगा बुवा आपल्याला !

**सदानंद** : पण ख्रिस्ती व्हायचा जुलूम कोणी केला आहे तुमच्यावर? आहांत हिंदुधर्मांत तें काय वाईट आहे ?

**त्रिभुवन** : हं, हिंदुधर्माचं नांव काढूं नका माझ्यापुढं ! आम्हीं अस्पृश्यांनीं एकजात धर्मांतराची घोषणा केली आहे ! हिंदुधर्म हा नादान लोकांचा धर्म आहे—

**अलका** : अहो, तुम्हांला ख्रिस्ती व्हायचं असेल तर खुशाल व्हा. पण हिंदुधर्माला कशाला शिव्या देतां आहांत विनाकारण ? बाकी मला स्वतःला कोणत्याच धर्माचं प्रेम नाहीं म्हणा—

**त्रिभुवन** : ( रागाच्या अविर्भावांत ) पांच हजार वर्षें तुम्हीं स्पृश्य हिंदूंनीं धर्माच्या नांवाखालीं आम्हां अस्पृश्यांना नरकांतल्या किड्याप्रमाणं कुजत ठेवलंत–महारोगानं सडलेल्या रोग्याप्रमाणं सहा कोट लोकांना तुम्ही हजारों वर्षें तिरस्कारानं झिडकारीत आलांत–( दांत चावून ) आग लावा त्या हिंदुधर्माला !

**सदानंद** : अहो, तें प्या आधीं ! म्हणजे तुमचा हिंदुधर्मावरचा राग सगळा शांत होईल !

[ त्रिभुवन ग्लास घटघट पिऊन रिकामा करतो.

**माणिक** : काय म्हणावं यांना आतां ? ख्रिस्ती झाल्यावर तुम्हांला असली भाषा वापरतां यायची नाहीं ! आमच्या धन्य प्रभूनं मुळीं सांगूनच ठेवलं आहे, कीं एका गालावर मारलं तर दुसरा गाल पुढं करा—

**त्रिभुवन** : तें तुम्हां बायकांसाठीं सांगून ठेवलं असेल, पुरुषांसाठीं नाहीं ! म्हणे एका गालावर मारलं तर दुसरा गाल पुढं करा ! मी लष्करी माणूस आहे ! माझं कुणी बोट दाबलं तर मी दुसऱ्याचा गळा दाबीन ! ठोशास ठोसा आणि गुद्द्यास गुद्दा ! धर्मांतर करून हिंदुधर्मावर आम्ही सूड उगविणार !

**सदानंद** : हें पहा, हिंदुधर्मावर तुम्हांला सूडच घ्यायचा असेल तर ख्रिस्ती होण्यापेक्षां तुम्ही मुसलमान व्हा ! ख्रिस्ती माणसाच्या तोंडीं असली खाटकाची क्रूर भाषा शोभत नाहीं–नाहीं का हो माणिकबाई ?

**माणिक** : शेजाऱ्यावर प्रेम करीत जावं असं आमच्या शास्त्रांत सांगितलं आहे.

**सदानंद** : शेजाऱ्याचा तिरस्कार करून शेजारणीवर प्रेम करा असं लिहिलं असेल त्यांत, नीट बघा—

**अलका** : पुरे झाला हा तुमचा वात्रटपणा ! इतक्या वेळांत आपलं एक राऊंड पुरं झालं असतं सदानंद !

**सदानंद** : पण तूं दमली होतीस ना ?

**अलका** : हो, मी दमलें आहें ! रात्रभर नाचलें तरीसुद्धां मी दमायची नाहीं ! इंग्लंडमध्यें असतांना आम्ही किती किती नाचायचं ! नाच म्हटला कीं मी माझं देहभान विसरून जातें–नाचाचं नांव काढलं कीं माझ्या शरीरांतला कण न् कण आनंदानं नाचूं लागतो.

हांसे, नाचे थयथय हें मन,
फुलती कणकण अंगीं या !
नाचरंग हा कुणा न रुचतो ?
हर्षभरें हा जीव डोलतो !
फुलांफुलांतुनि वायु नाचतो,
निशिदिनिं रुमझुम रानीं तो !

हं अुठा, त्रिभुवन, मी तुम्हांला नाचायला शिकवतें !

[ अलका त्रिभुवनचा हात धरून उठवते. तो नाखुषीनें उठतो. सदानंद माणिकला उठवतो. ग्रामोफोनची नवी तबकडी लावल्यानंतर त्रिभुवन–अलका आणि सदानंद–माणिक नाचूं लागतात. थोड्या वेळानें बाहेरून 'अलका –अलका !' अशी हांक ऐकूं येते. त्याबरोबर नाच एकदम थांबतो.

**अलका** : बाबा आले वाटतें !

[ सर गुरुनाथ घाईघाईनें प्रवेश करतात. त्यांना कसला तरी अतिशय आनंद झालेला असतो.

**गुरुनाथ** : अलका–अलका—

**अलका** : काय बाबा ?

**गुरुनाथ** : आनंदाची बातमी–अतिशय आनंदाची बातमी !

**अलका** : ( आनंदून नाचत ) खरंच म्हणतां ?

**गुरुनाथ** : तुला कल्पना नाहीं मी काय सांगणार आहें तें ! सदानंद–त्रिभुवन, कॉंग्रॅच्युलेट मी ! वंडरफुल न्यूज ! लोकपक्षानं मंत्रिपदं स्वीकारण्याचं नाकारलं ! टाळी द्या !

**सदानंद** : मला वाटलंच हे खादीवाले लोक असा कांहीं तरी इरसाल गाढवपणा करणार !

**त्रिभुवन** : मग कौन्सिलांत गेले कशाला मरायला ? घाबरले लेकाचे !

**अलका** : पण कारण काय त्यांना असं करायला ?

**गुरुनाथ** : कारण ? मंत्रिमंडळाच्या कारभारांत ढवळाढवळ करणार नाहीं असं स्पष्ट आश्वासन त्यांनीं गव्हर्नरकडून मागितलं ! गव्हर्नरानं आश्वासन देण्याचं साफ नाकारलं !

**सदानंद** : नाकारणारच तो ! गव्हर्नर म्हणजे काय यांच्या बापाचा नोकर !

**त्रिभुवन** : मी जर गव्हर्नर असतों तर लाथ मारून हाकून दिलं असतं एकेकाला !

**अलका** : बरं मग ?

**गुरुनाथ** : मग काय ? लोकपक्षाच्या पुढाऱ्यांनीं अधिकारग्रहण करण्याचें स्पष्ट नाकारतांच गव्हर्नरसाहेबांनीं कौन्सिलांतील इतर पक्षांच्या पुढाऱ्यांना मंत्रिमंडळ बनविण्यासाठीं तातडीनं पाचारण केलं आहे. मला देखील बोलावणं आलं आहे—

**सदानंद** : काय म्हणतां ?

**गुरुनाथ** : गव्हमेंट हाऊसवरून आतांच घोडेस्वार बोलवायला आला मला ! बघतां काय ? हें काय, निघालोंच मी ! आतांचे आतां गेलंच पाहिजे मला !

**सदानंद** : ( त्यांचा एक हात हलवीत ) कॉंग्रॅच्युलेशनस्—

**त्रिभुवन** : ( दुसरा हात हलवीत ) कॉंग्रॅच्युलेशन्स्—

**गुरुनाथ** : अरे, थांबा—थांबा—अजून अवकाश आहे—इतक्यांतच काय—

**सदानंद** : अवकाश कसला ? छातीला हात लावून सांगतों मी कीं तुम्ही दिवाण होणार ! अलका, कॉंग्रॅच्युलेशन्स—( तिचा हात हलवतो ) तुझे वडील आपल्या इलाख्याचे प्रधान होणार ! आहेस कुठं तूं !

**माणिक** : कॉंग्रॅच्युलेशन्स अलका—

**त्रिभुवन** : काय म्हणतां, प्रधान ! रॉट ! मी सांगतों कीं सर गुरुनाथ आपल्या इलाख्याचे मुख्य प्रधान होणार ! हिअर्स टु दी हेल्थ ऑफ द फर्स्ट प्राइम मिनिस्टर ऑफ् बांबे प्रेसिडेन्सी !

[ पितो.

**अलका** : मी जागी आहें का स्वप्नांत आहें हेंच मला कळत नाहीं ! खरंच तुम्ही मुख्य प्रधान होणार बाबा ? खरंच—खरंच प्रधान होणार ? ( त्यांच्या अंगाला धरून नाचूं लागते ) किती मोठे आहेत माझे बाबा !

[ त्यांच्या गळ्याला मिठी मारते.

**गुरुनाथ** : हा सारा तुझा पायगुण अलका ! तुझ्या वाढदिवशीं हा भाग्याचा सूर्य उगवला !

**त्रिभुवन** : हें पहा सरसाहेब, तुम्ही प्रधान व्हा नाहीं तर मुख्य प्रधान व्हा ! पण तें अबकारी खातं मात्र तुम्ही आपल्या ताब्यांत घ्या ! नाहींतर, घ्याल बावळटाखारखें तें शिक्षण खातें !

**सदानंद :** छान, म्हणजे तुझी पिण्याची आयतीच सोय होईल होय रे ? तें कांहीं नाहीं सरसाहेब, तुम्ही शेतकीखातं आपल्या ताब्यांत घ्या ! मी मराठा लीग पक्षाचा पुढारी आहें ! काय वाटेल ती मदत करायला तयार आहें मी—

**त्रिभुवन :** अहो मराठा लीगचे पुढारी ! बस करा कीं ! परवाच्या निवडणुकींत पडलांत तें पुरें नाहीं का झालं ? डिपॉझिट देखील जप्त झालं तुमचं !

**गुरुनाथ :** ( हातांतल्या घड्याळाकडे पाहून ) म्हणजे अवघीं पंचवीस मिनिटें उरलीं–अजून माझा पोशाख व्हायचाय्–बेअरर, कुठं आहे हा गद्धा ? ( मोठ्यानें ) बेअरर–( गडी येतो. ) बेशरम, कुठं गेला होतास ? माझा पोषाख काढ जलदी–( तो धांवतो. ) ए गद्धया, थांब–पळतोस कुठं ? तो काळा सूट काढ–गव्हर्नरसाहेबाला भेटायचा–कडक कॉलर अन् तो काळा ठिपक्याचा टाय–

**अलका :** बाबा, आजचे आज पांचशें रुपयांचं पातळ मी घेऊन येणार–आणि दोन हजारांच्या हिऱ्याच्या कुड्या–

**गुरुनाथ :** थांब ग–अन् तो पेटंट लेदरचा काळा शू–खमिसाला सोन्याचीं बटनं लाव—

**अलका :** बाबा, आणि आपल्याला आतां नवीन मोटरगाडी घ्यायला पाहिजे—

**गुरुनाथ :** हो–हो–हो–सगळं होईल ! घाई काय–मला मुख्य प्रधान तर होऊं दे ! प्रत्येक मंत्र्याला स्टुडबेकरची कोरी करकरीत गाडी घेऊन देतों. बेअरर, चाललास कुठं–हा कोट घेऊन जा–एक रुमाल घेऊन ये–सेंट टाक त्याच्यावर. पळ–( गडी जातो. ) सतरा वर्षे आम्ही ओरडतों आहोंत कीं कौन्सिलांत घुसलं पाहिजे आणि मिळतील तेवढे अधिकार हिसकावून घेतले पाहिजेत ! अजून या लोकांचे डोळे उघडत नाहींत ! ( गडी टॉवेल घेऊन येतो. ) रुमाल पाहिजे–टॉवेल नाहीं ! गद्धया–( गडी पळतो. ) शेवटीं आमचंच राजकारण खरं ठरणार ! कौन्सिलमध्यें शिरून हे लोक निव्वळ आपली नाचक्की करून घेणार असं मीं आधीं भविष्य केलं होतं तें अगदीं खरं ठरलं ! ( गडी रुमाल आणून देतो, त्याच्या दुसऱ्या हातांत पगडी असते. )

पगडी कशाला आणलीस ? गव्हर्नर साहेबाला भेटायला जायचंय् ! लग्नाला जायचं नाहीं मला ! छे, मी गेल्याशिवाय हें उरकायचं नाहीं.

[ आंत जातात.

**अलका** : ( सदानंदाला ) उद्यांचे उद्यां मोटरगाडी आणणार मी नवीन ! आहांत कुठं ? आलें मी !

[ पळत आंत जाते.

**सदानंद** : अलका—आतां मला जोर आला ! या खादीवाल्या लोकपक्षाच्या कारवाईमुळें गेल्या निवडणुकींत मी सपशेल पडलों ! थोडाथोडका नाहीं—पांच हजार रुपयांला चट्टा बसला चांगला मला ! सरसाहेब होऊं द्या आतां मुख्य प्रधान—असा एकेकाचा काटा काढतो ! बाकी कांहीं म्हणा त्रिभुवन, सरसाहेब म्हणजे अगदीं लाख मनुष्य आहे ! शेवटीं आला त्यांच्या आयुष्यांतला 'चान्स' ! त्यांचं माझ्यावर लहानपणापासून भारी प्रेम—ही ईज जस्ट लाइक अ फादर टु मी !

**त्रिभुवन** : फादर ? व्हाय् ! ही वुईल सून बी लाइक अ फादरइन्—लॉ—टु यू !

**सदानंद** : अहो, भलतंच काय ?

**त्रिभुवन** : मेहरबान, आम्हाला ठाऊक आहे सारं ! तुम्ही त्या निवडणुकींत पडलांत खरे. पण ही निवडणूक मात्र नक्की जिंकणार !

**सदानंद** : हळूं—ऐकूं जाईल त्यांना आंत—

**माणिक** : गेलं तर गेलं—खोटं काय आहे त्यांत ?

**सदानंद** : पण सांगितलं कुणीं तुम्हांला हें ?

**त्रिभुवन** : प्रेमाच्या भानगडी सांगाव्या लागत नाहींत कोणी कोणाला ! त्या आपोआपच बाहेर येतात. ए खरं सांग, माझ्या ग्लासची शपथ आहे, तुझं प्रेम नाहीं तिच्यावर ?

**सदानंद** : ( घुटमळत ) प्रेम—अं—

**त्रिभुवन** : खरं बोल—खरं बोल—निवडणुकीच्या वेळीं मतदारांच्या पुढं व्याख्यानं झोडतांना खोटं बोलायची संवय लागली आहे तुला ती अजून सुटत नाहीं वाटतं—

**माणिक** : किती लाजतां आहांत? बोला ना–

**सदानंद** : नाहीं, म्हणजे माझं तिच्यावर प्रेम आहे–

**त्रिभुवन** : बस, तेवढं पुरें! टु द हेल्थ ऑफ युअर लव्ह!

[ पितो.

**सदानंद** : पण तिचं माझ्यावर प्रेम असलं पाहिजे ना! इंग्लंडहून येऊन तिला आतांच कुठं दोन महिने झाले आहेत. मला तिच्याशीं मोकळेपणानं बोलायला वेळ कुठं झाला आहे?

**त्रिभुवन** : मग तुम्ही थांबला आहांत कशासाठीं? प्रेमाच्या आणि लढाईच्या बाबतींत दिरंगाई नसावी! एक घाव कीं दोन तुकडे! हिला विचारा. काय माणिक—

**माणिक** : पुरें झालं तुमचं!

**सदानंद** : पण तिचं त्या दिलीपवर प्रेम आहे ना! पांच सहा वर्षांपूर्वीं हीं इंग्लंडला गेली, त्यावेळीं त्यांचं लग्न जवळजवळ ठरलं होतं म्हणतात!

**त्रिभुवन** : दिलीप म्हणजे तो गांवटी गांधी! उं:, आतां त्याची कशाला गोष्ट काढतां! पांच वर्षें तिकडे इंग्लंडमध्यें राहून ही पक्की मड्डम बनून आलीं आहे, तर इकडे गेल्या पांच वर्षांत चार वेळा तुरुंगाच्या वाऱ्या करून दिलीप म्हणजे अगदीं निढावलेला देशभक्त बनलेला आहे. ती टेम्स नदी तर हा टिळक तलाव! त्यांचं हो कसं जमणार?

**माणिक** : शिवाय तुम्ही एवढे मोठे बॅरिस्टर—

**त्रिभुवन** : मराठा लीग पक्षाचे पुढारी–आतां डिपॉझिट जप्त झालें तें सोडून द्या! मी खात्रीनं सांगतों तुम्हांला सदानंद, तुम्हीं अलकाला मागणी घालण्याचा अवकाश– ती तुमच्या गळ्यांत पडलीच म्हणून समजा!

**सदानंद** : गेल्या निवडणुकींत अपयश आल्यापासून माझा आत्मविश्वास अगदीं ढासळून गेला आहे हो! म्हणून अलकाशीं बोलणं काढण्याच्या बाबतींत मन जरा कच खातं आहे! तिनं नाहीं म्हटलं तर–

**त्रिभुवन** : ती काय नाहीं म्हणते! मी सांगतों तुम्हांला–तुम्ही आजचे आज या गोष्टीचा निकाल लावून टाका! आणि तसं तुम्हांला भयच वाटत असेल

तर तुम्ही आमच्याकडे काम सोपवा–म्हणजे तुमच्या वतीनें ही निवडणूक आपण लढवतों.

**माणिक** : शुद्धीवर आहांत का? अलीकडे तुम्हीं सारी लाजलज्जा सोडली आहे–

**त्रिभुवन** : जो धर्म सोडायला तयार झाला, तो काय वाटेल तें सोडायला तयार होईल !

[ सर गुरुनाथ नेकटायची गांठ बांधीत येतात. अलका तुषार कुपीमधून अत्तराचे फवारे त्यांच्या अंगावर उडवीत आहे.

**गुरुनाथ** : काय वाटेल तें झालं तरी लोकपक्षाचा बोजवारा आतां उडवायलाच पाहिजे !

**सदानंद** : तें सगळं खरं! पण बाकीचे सारे पक्ष जरी एकत्र झाले तरी लोकपक्षाविरुद्ध कौन्सिलमध्यें बहुमत कसं होणार तुमचं ?

**त्रिभुवन** : आमच्या धर्मांतरवादी पक्षाला जर तुम्हीं मंत्रिमंडळांत स्थान दिलं तर आम्ही लोकपक्षाची बंभेरी उडवून टाकूं. गव्हर्नरसाहेबांना माझं नांव सांगायला विसरूं नका—

**सदानंद** : तुम्ही माझ्या सल्ल्याप्रमाणें वागा. मी मराठा लीग पक्षाचं सारं पाठबळ तुमच्या मंत्रिमंडळाला दिल्याशिवाय रहाणार नाहीं !

**गुरुनाथ** : बेअरर, माझा कोट आण ! तुम्ही थांबा जरा ! आमचं मंत्रिमंडळ बनूं द्या एकदां, म्हणजे लोकपक्षाचं बहुमत कसं टिकून रहातं तें तुम्हांला दाखवितों ! ( गडी येऊन कोट घालतो. ) तुम्हाला ठाऊक आहे, निवडणुकीच्या वेळीं लोकपक्षाचा वाढता जोर आहे असें पाहतांच मंत्रिपदं मिळवण्याच्या आशेनं पुष्कळशा सरकारजमा दिवाणबहादुरांनीं आणि आशाळभूत रावबहादुरांनीं आपापल्या पदव्या आणि बिल्ले भिरकावून दिले आणि खादीचे अभ्रे अंगावर चढवून ते लोकपक्षातर्फे निवडून आले ! दिवाण होण्याच्या आशेनं आतांपर्यंत जिभल्या चाटीत बसले होते लेकाचे ! पण लोकपक्षानं अधिकारग्रहण करण्याचं ऐनवेळीं नाकारल्यामुळें आतां त्यांच्या जिभा सव्वा हात बाहेर येतील ! बेअरर, घड्याळ आण माझं. ( गडी जातो ) तुम्हांला असं वाटतं का, हे होळीचे होळकर लोकपक्षाला आतां चिकटून राहतील म्हणून ? नांव कशाला !

यांच्यापुढें जरा लोण्याचा गोळा टाकला कीं खादीची कातडी भिरकावून हे तावडतोब आमच्या गोटांत सामील होतील ! ( गडी मोठें घड्याळ घेऊन येतो.) गद्धया, हातांत घालायचं घड्याळ,! फोडूं का टाळकं ! ( गडी पळत जातो. ) तुम्ही पहा तर खरं ! हां हां म्हणतां लोकपक्षाचे पाय मी मोडून टाकतों ! ( गडी घड्याळ आणतो. ) अलका, माझी टोपी आण. ( अलका फेल्ट हॅट घेऊन येते. ) ही काय—झालीच वेळ ! एक्सक्यूज मी—तुमचं चालू द्या. मला किती वेळ लागेल तें सांगतां येत नाहीं ! वुइश मी गुड लक !

**सदानंद** : सर्टनली. गुड काय—बेस्ट लक ! आतां माझ्या एकट्याच्याच काय—पण माझ्या हजारों मराठा बंधूंच्या सदिच्छा तुमच्या बरोबर आहेत असंच समजा.

**त्रिभुवन** : तुम्ही येईपर्यंत तुमच्यासाठीं मी आकाशांतल्या बापाची प्रार्थना करून त्याला भंडावून सोडतों.

**गुरुनाथ** : अच्छा, चीरिओ !

[ जातो. अलका त्याच्याबरोबर नाचत नाचत जाते.

**त्रिभुवन** : ( गंभीरपणें उभा राहून ) हे आकाशांतील बापा, आमच्या सन्मान्य बंधूवर त्वां प्रीत व्हावेंस आणि त्यास मुख्य प्रधान करावेंस, कां कीं, तो प्रधान झाल्यास आम्हांस भरपूर खायला आणि विशेषतः प्यायला मिळेल ! आमेन !

[ पितो.

**माणिक** : अहो, आतां पुरें ना ! काय, करताय् काय ?

**त्रिभुवन** :( अलका बाहेर गेली असें बघून ) ए सदानंद, मघाशीं मी सांगितलं त्यासाठीं ही वेळ फक्कड आहे. आम्ही बागेंत जातों—तोंपर्यंत तुम्ही आटपा झटपट—

**माणिक** : काम फत्ते झालं पाहिजे बरं का !

**सदानंद** : पण मी बोलूं काय तिच्याशीं ? माझं मन अगदीं गोंधळून गेलं आहे !

**त्रिभुवन** : खूप बॅरिस्टर आहेस ! दुसऱ्याच्या केसेस कोर्टात जाऊन भांडतोस आणि स्वतःची केस कशी मांडावी हें तुला कळत नाहीं ! म्हणे बोलूं काय ? बोल मोरे राजा रे, कांहीं तरी हंसुनी बोल ! चल माणिक—

[ त्रिभुवन व माणिक घाईघाईनें बागेंत जातात. सदानंद गोंधळून जातो व आरशापुढें उभा राहून झटपट कपडे साफ करतो. इतक्यांत अलका नाचत व गात येते.

**अलका** : इतका आनंद आयुष्यांत मला कधीं झाला नव्हता ! इंग्लंडला जातांना जो मला आनंद झाला—लंडन युनिव्हर्सिटीची एम. ए.ची पदवी मिळाली त्यावेळीं जितका मला हर्ष झाला किंवा परत हिंदुस्थानच्या किनाऱ्यावर पाऊल टाकतांना जेवढा मला आनंद वाटला त्या सर्व आनंदाची बेरीज केली तर ती आज वाटणाऱ्या आनंदाच्या पासंगालाही पुरणार नाहीं !

गमत मम सुखा नाहीं तुला !
पूर हृदयीं दुथडि आला,
जीव भुलला, धुंद झाला !
पडती या वरुनी वाटे
अमृतधारा काय बाई ?
व्याकुळ झाला जीव सारा !

**सदानंद** : तुझ्या या आनंदांत मी तुझ्याइतकाच भागीदार आहें याविषयीं खात्री बाळग—

**अलका** : खरंच, बाबा मुख्य प्रधान होणार !

**सदानंद** : होणार ? भविष्य काळ कशाला ! झालेच म्हणून समज ! यापूर्वीच त्यांना हा मान मिळायला हवा होता ! तुला कल्पना नाहीं ? नाना फडणविसानंतर तुझ्या वडिलाइतका मुत्सद्दी पुरुष महाराष्ट्रांत होऊन गेला नाहीं !

**अलका** : बाबा मुख्य प्रधान—आणि मी मुख्य प्रधानाची मुलगी !

[ आनंदातिशयानें अलका सदानंदाच्या हातांत हात घालून खूप हंसते. तो देखील हंसण्याचा कृत्रिम प्रयत्न करतो. एवढ्या वेळांत त्रिभुवन व माणिक मागून हळूच डोकावून पहातात व तें दृश्य पाहून आनंदानें मागल्यामागें नाहींसे होतात.

**अलका** : कां हो, गव्हर्नर साहेब येतात का मुख्य प्रधानाच्या घरीं ?

**सदानंद** : म्हणजे ? प्रश्न आहे काय ! मुख्य प्रधान म्हणून नेमणूक होऊं द्या यांची आज ! म्हणजे उद्यांपासून रोज सकाळीं गव्हर्नरसाहेब इथं चहाला अगदीं ठेवलेलेच म्हणून समजा. आणि तुम्हांला तर डान्ससाठीं गव्हर्नमेंट हाऊसवरून बोलावण्यावर बोलावणीं येतील ! आहांत कुठं ? मुख्य प्रधान म्हणजे काय सामान्य प्रस्थ आहे ?

**अलका** : मला या घराचा अवतार आतां पार बदलला पाहिजे. एवढी मोठमोठी मंडळी घरीं येणार—कांहीं कळा आहे का या घराला ? दिवाणखान्यांतल्या गालिचापासून तों छपरावरच्या कौलांपर्यंत सगळं बदलून टाकलं पाहिजे ! बागेसाठीं आणखी एक माळी, स्वयंपाकासाठीं बटलर, नवीन मोटरगाडी—छे, मला आतां एक यादीच केली पाहिजे ! ( एकदम आठवण होऊन ) आणि पातळं आणि साड्या तर मला एकूण एक नवीन घेतल्या पाहिजेत ! किती गचाळ दिसते आहे ही साडी ! तुम्हांला नाहीं वाटत ?

**सदानंद** : छे, तुमचं कांहीं एक वाईट दिसणं शक्यच नाहीं मला ! कांहींही नेसलांत तरी तुम्ही सुंदरच दिसणार !

**अलका** : तें कां !

**सदानंद** : कारण तुम्ही सुंदर आहांत म्हणून ! कल्पना आहे यावेळीं तुम्ही किती सुंदर दिसतां आहांत त्या !

**अलका** : अस्सं !

**सदानंद** : एक प्रश्न विचारूं का ? सुंदर स्त्रियांना स्वतःच्या सौंदर्याबद्दल काय वाटत असतं हो ?

**अलका** : मला माझ्या सौंदर्याबद्दल काय वाटतं याचा मीं कधींच विचार केलेला नाहीं !

**सदानंद** : तुम्हांला तुमच्या सौंदर्याबद्दल काय वाटतं याचा तुम्हीं कधीं विचार केला नसला तरी, तुमच्या सौंदर्याबद्दल दुसऱ्यांना काय वाटतं याचा तुम्हीं कधीं विचार केला आहेत का ? तुम्ही सुंदर स्त्रिया भारी दुष्ट असतां !

**अलका** : दुष्ट ! त्या कशा काय ?

**सदानंद** : तुम्ही रस्त्यानं बिजलीच्या फटकाऱ्यासारख्या पुढं निघून जातां आणि पाठीमागं आमच्या सारख्यांचे फटाफट मुडदे पडतात, याची तुम्हांला जाणीव आहे का हो ? माझी तर अशी सूचना आहे कीं गांवांतील सुंदर स्त्रियांच्या मागोमाग रेड क्रॉसच्या गाड्या नेण्याची सोय म्युनिसिपालिटीनं करावी ! म्हणजे घायाळ झालेल्या तरुणांना ताबडतोब इस्पितळांत तरी रवाना करतां येईल !

**अलका** : इतके मिष्ठास बोलतां तुम्ही—अन् त्या निवडणुकींत कसे पडलांत हो ?

**सदानंद** : निवडणुकींत मी कां पडलों ! योग्य प्रश्न विचारलांत ! मी मराठा लीग पक्षाचा पुढारी असतांना निवडणुकींत पडलों—नुसता पडलों नाहीं तर सपशेल पडलों—इतका कीं माझं डिपॉझिट देखील जप्त झालं—याचं कारण काय तें तुम्हांला ठाऊक आहे ?

**अलका** : तेंच तर विचारतें आहे मी !

**सदानंद** : त्याचं कारण—अलका, याचं कारण तूं आहेस !

**अलका** : म्हणजे, काय म्हणतां काय ! मी त्यावेळीं हिंदुस्थानांत तरी होतें का !

**सदानंद** : तूं हिंदुस्थानांत नव्हतीस पण इकडं येण्याच्या तयारींत होतीस ! मग निवडणुकींत माझं लक्ष लागेल असं तुला वाटलं तरी कसं ? माझं सारं लक्ष, अलका, तुझ्या वाटेकडे लागलं होतं !

**अलका :** तुम्ही काय सांगतां हें मला खरं सुद्धां वाटत नाहीं ! इंग्लंडला जायच्यापूर्वी तुमची माझी तशी फारशी ओळख देखील नव्हती. मी इकडे आल्यापासून गेल्या दोन महिन्यांतच आपली विशेष मैत्री जमली !

**सदानंद :** असं तुला वाटतं. पण गेलीं पांच वर्षं मी तुझ्याबद्दल अहोरात्र विचार करीत आहे. तूं तिकडे इंग्लंडमध्यें होतीस तरी रोज रोज माझ्या स्वप्नांत यायचीस इथं ! आणि हरिश्चंद्रानं ज्याप्रमाणं आपलं राज्य स्वप्नांत एका ब्राह्मणाला दान देऊन टाकलं त्याप्रमाणें माझं हृदयही मीं तुला असंच एका रात्रीं स्वप्नांत दान देऊन टाकलं. आणि तुला माझ्या प्रेमाची अधिष्ठात्री बनविलं. माझं प्रेम हें दोन महिन्यांत उठलेलं वादळ नाहीं. यूरोप जिकण्यासाठीं हिटलर ज्याप्रमाणें वर्षानुवर्षं टपून बसला होता, त्याप्रमाणें कित्येक वर्षं मी तुझ्यासाठीं प्रेमाचें टिपण धरून बसलों आहे.

**अलका :** पण तुम्ही माझ्यावर प्रेम करीत असाल असं स्वप्नांतसुद्धां मला कधीं वाटलं नाहीं !

**सदानंद :** तुला कल्पना आहे तुझ्यावर माझं किती प्रेम आहे तें ? सर रघुनाथ परांजप्यांचं आपल्या आंकडेदार मिशांवर जेवढं प्रेम नसेल, जवाहरलाल नेहरूंचं आपल्या जाकिटावर जितकं प्रेम नसेल किंवा महात्मा गांधींचं आपल्या शेळीवर जेवढं प्रेम नसेल तेवढं तुझ्यावर माझं प्रेम आहे.

**अलका :** मग इतके दिवस तुम्हीं बोलला कां नाहींत ?

**सदानंद :** प्रेम हें नेहमींच मुकं असतं ! खरं प्रेम हें महात्माजींप्रमाणें फक्त सोमवारीच मौन धरीत नसून वर्षाचे तीनशें पासष्ट दिवस तें मौनव्रत धरून बसलेलं असतं.

**अलका :** मग आतां त्या प्रेमाचं म्हणणं काय आहे ?

**सदानंद :** म्हणणं काय असणार ? राष्ट्रांतल्या सर्व राजकीय चळवळींचें ध्येय ज्याप्रमाणें स्वराज्य हें एकच, त्याप्रमाणें प्रेमाचा सारा प्रॉपेगॅंडा विवाहासाठींच असतो. मला विवाहाचं वचन—

**अलका :** एकदम वचन ! भले शाबास ! ( हंसते. तो अगदीं विरमून जातो. )

इतके हिरमुष्टि होऊं नका ! तुम्हांला काय म्हणायचं होतं तें मला कळलं ! करूं सावकाश विचार !

**सदानंद** : तुम्ही अगदीं ब्रिटिश सरकारची भाषा वापरायला लागलांत ! प्रेमाच्या सृष्टींत हप्त्याहप्त्याच्या स्वराज्याची भाषा ऐकून कोणाला समाधान वाटणार ? माझ्या उत्कट प्रेमाची तुला अजून खात्री वाटत नाहीं ? तुझ्यासाठीं वाटेल तो त्याग करावयाची माझी तयारी आहे ! मी जर एकाद्या राज्याचा अधिपति असतों तर ड्यूक ऑफ विंडसर नंतर मीं माझंच नांव जगाला घ्यायला लावलं असतं !

**अलका** : पण दिलीपवर माझं प्रेम आहे हें तुम्हांला माहीत नाहीं ? त्यांचं व माझं लग्न मागं जवळजवळ ठरल्यासारखंच होतं !

**सदानंद** : ठरल्यासारखं असलं तर मोडतां येईल, त्यांत आहे काय ? लग्नाचं वचन म्हणजे कांहीं राणीचा जाहिरनामा नव्हे कीं जो कधींच बदलतां यायचा नाहीं ! चार वेळां तुरुंगाच्या वाऱ्या केलेल्या त्या दरिद्री देशभक्ताशीं तूं लग्न करणार ? उठ–पळ तुरुंगाच्या वाऱ्या करणाऱ्या माणसाशीं तूं संसार तरी कसा करणार ? त्यापेक्षां खुशाल अविवाहित रहावें आणि यजमान जन्मठेप काळे-पाण्यावर गेलेत म्हणून लोकांना सांगावें !

**अलका** : पण देशासाठीं तुरुंगांत जाणें म्हणजे कांहीं सामान्य गोष्ट नाहीं !

**सदानंद** : असं तुला वाटतं ! देशासाठीं तुरुंगांत जाणं हा आजकाल सुशिक्षित मवाली लोकांचा प्रतिष्ठित धंदा होऊन बसला आहे. तुरुंगांत गेलं कीं 'अ' वर्ग आपला ठेवलेलाच ! सांजसकाळ पावलोणी खायचं, आराम-शीर बसून वर्तमानपत्रं वाचायचीं, अजीर्ण झाल्यास कांहीं तरी सबब काढून अन्नसत्याग्रह पुकारायचा, आणि सुटल्यानंतर गळ्यांत हार घालून वाजत गाजत घरीं परत यायचं–संपली सारी देशसेवा ! असल्या सवंग देशभक्तीच्या नादांत वाहवत गेल्यानं दिलीपनं आपल्या आयुष्याचं गेल्या चार वर्षांत मातेरं करून घेतलं आहे. आणि आतां तर तूं मुख्य प्रधानाची मुलगी होणार ! कुठं तो आणि कुठं तूं ? तुझ्या एका पातळाच्या किंमतींत त्याचे पन्नास खादीचे सदरे तयार होतील.

**अलका** : मी यायला आणि दिलीप तुरुंगांत असायला एकच गांठ पडली.

म्हणून तुम्ही जें काय सांगतां तें मला पडताळून पहायला वेळच आली नाहीं. काल सुटले असतील ते—आतां येतील बहुतेक—

**सदानंद** : मी सांगतों, तो आज येत नाहीं. तुझ्यापुढें उभं रहायची छाती नाहीं त्याला ! आतां तो तुझा पट्टेवाला देखील शोभायचा नाहीं !

**अलका** : खरं सांगायचं म्हणजे विलायतेला गेल्यापासून मीं माझ्या विवाहा-संबंधीं अद्यापि विचारच केला नाहीं ! आणि आतां बाबा मुख्य प्रधान झाले म्हणजे तर त्या करणें शक्यच नाहीं मला ! मोठमोठी मंडळी घरीं येणार, बैठका होणार, मेजवान्या होणार आणि मी घरांतून गेलें म्हणजे ही व्यवस्था कोण पाहाणार इथली !

**सदानंद** : हात्तिच्या, लग्न करायचं म्हणजे तुला या घरांतून बाहेर जायलाच पाहिजे असं थोडंच आहे ? माझ्यापुरतं मी एवढं सांगूं शकेन कीं, माझ्याशीं जर तूं लग्न केलंस तर घरजांवई म्हणून या घरांत कायमचा मुक्काम करण्याची माझी तयारी आहे.

**अलका** : छान ! म्हणजे दुसऱ्या पाहुण्याकडे लक्ष द्यायची सोयच नको ! कांहीं झालं तरी बाबा जोंपर्यंत प्रधान आहेत तोंपर्यंत मीं लग्न करणं शक्यच नाहीं !

**सदानंद** : अशी तुझी प्रतिज्ञाच असेल तर बोलणंच संपलं ! तरी कांहीं हरकत नाहीं ! जास्तींत जास्ती मंत्रिमंडळ पांच वर्षें टिकेल ! म्हणजे मला प्रिया-राधनाची पंचवार्षिक योजना करून ठेवावी लागणार असं दिसतंय् !

**अलका** : इतका वेळ काय करते ही माणिक बाहेर ? ( ती बागेच्या दरवाजांत जाते व टाळ्या वाजवून त्रिभुवन व माणिक यांना बोलावते. तीं येतात. ) माणिक, बाबा येईपर्यंत आपण त्यांचा वरचा दिवाणखाना सजवून टाकूं !

[ दोघी जातात.

**त्रिभुवन** : काय, निवडणूक फत्ते ?

**सदानंद** : बरीचशी—

**त्रिभुवन** : बरीचशी ! सगळी नाहींच का ? हात्तिच्या !

**सदानंद** : नाहीं म्हणजे, अगदींच डिपॉझिट जप्त नाहीं ! पण जरा दमाद-दमानं घ्यावं लागेल असं दिसतंय् !

[ इतक्यांत सोमेश्वर घाईघाईनें येतो.

**सोमेश्वर** : कुठं आहेत सरसाहेब ? कुठं आहेत सरसाहेब !

**सदानंद** : ओहोहो, कोण सोमेश्वर ? अलभ्य लाभ ! तुम्ही कुठं इकडे ?

**सोमेश्वर** : म्हणजे मीं ही बातमी ऐकली आणि आमच्या 'आर्यगप्पा मंडळाची' बैठक सोडून तसाच धांवत आलों ! म्हटलं 'सनातनी स्वराज्यसंघा'तर्फे सरसाहेबांचं पहिल्या प्रथम अभिनंदन करून येऊं द्या !

**सदानंद** : गव्हर्नर साहेबांच्या भेटीला गेले आहेत ते ! अजून त्यांना अवकाश आहे यायला !

**सोमेश्वर** : अतिशय आनंद झाला मीं हें ऐकलं तेव्हां ! आमच्या राजकारणाचा विजय झाला आज ! काय सांगावं, या कायदेभंगी सुताळ लोकांनीं गेलीं सतरा वर्षें आमच्या राजकारणाचा चुथडा करून टाकला आहे ! आम्ही इतकीं वर्षें ठणाणा करतों आहोंत दोन्ही हातांनीं कीं बाबांनो, कौन्सिलांत शिरा आणि पराक्रम करा ! पण ऐकतोय् कोण लेकाचा ! जो तो उठतो तो खजूर खातो आणि चरखा फिरवतो. आणि म्हणतो "कौन्सिलमें जाना हराम आहे–कौन्सिलमें जाना हराम आहे !" शेवटीं काय झालं ! गेले सारे कोकलत कौन्सिलांत ! बरं, घुसले ते घुसले आणि आतां कोपऱ्यांत जाऊन कां हो रुसले ! सारे खादाळ तेवढे रटाळ ! सर गुरुनाथ या वेळीं प्रधान व्हायलाच पाहिजेत म्हणजे यांचे डोळे उघडतील !

**सदानंद** : सरसाहेबांची आणि तुमची एवढी दोस्ती आहे याची मला कल्पना नव्हती ! तुम्ही सनातनी, ते सुधारक —

**सोमेश्वर** : सामाजिक बाबतींत त्यांचा आमचा दक्षिण आणि उत्तर ध्रुवांइतका विरोध असला तरी राजकीय बाबतींत आमचीं दोघांचीं मतें तंतोतंत जुळतात ! किती झालं तरी आम्ही बळवंतरावाच्या बैठकींतली मंडळी —

**सदानंद** : बळवंतराव कोण ?

**सोमेश्वर** : लोकमान्य टिळक हो ! बळवंतरावांचं माझ्यावर भारी प्रेम. माझ्यावांचून त्यांना क्षणभर करमायचं नाहीं ! तुम्हांला कल्पना नाहीं, लोकमान्यांच्या वेळीं गायकवाडवाड्यांत सुपारीचं खांड देखील माझ्यावांचून कधीं फुटत नव्हतं !

**त्रिभुवन** : बरोबरच आहे. लोकमान्यांना तरी सुपारी फोडायला एवढा

भरभक्कम दगड पाहिजेच होता. बरं जाऊं द्या तें. सोमेश्वर, काय चाललंय तुमचं हल्लीं ? तुमचं ‘ मुष्टीमोदक ’ पत्र होणार कीं नाहीं पुन्हा सुरू ?

**सोमेश्वर** : होणार म्हणजे शंका आहे काय ! आमचा जामीनच सरकारनें जप्त केला त्याला आम्ही काय करणार ? नाइलाजानं आम्हांला पत्र बंद ठेवावं लागलं ! आतां सर गुरुनाथ प्रधान होऊं द्या म्हणजे करतों सगळं सुरू ! त्याशिवाय तुम्हां धर्मांतरवादी महारांची भंबेरी कोण उडवणार ?

**सदानंद** : हल्लीं तुमचं कांहीं ऐकूं येत नाहीं सोमेश्वर !

**सोमेश्वर** : आमचं काय ऐकूं यायचंय ? आम्हीं काय गिरणी आहोंत कीं खटारा आहोंत म्हणून आमचं ऐकूं यायचंय ! चाललंच आहे आमचं जें काय चालायचं तें ! आतां परवांच आमचा रुद्राभिषेक संपला —

**सदानंद** : कसला रुद्राभिषेक ?

**सोमेश्वर** : म्हणजे तुम्हांला ठाऊकही नाहीं ? हिन्दुस्थानला स्वराज्य मिळावं म्हणून गेले पंधरा दिवस आमच्या सनातन स्वराज्यसंघातर्फें ओंकारेश्वराला रुद्राभिषेक चालविला होता ना आम्हीं !

**सदानंद** : भले शाबास ! स्वराज्य मिळण्यासाठीं ओंकारेश्वराला अभिषेक !

**त्रिभुवन** : म्हणजे झालं ! हिंदुस्थानचे तीस कोट लोक ओंकारेश्वरावर गेले तरी स्वराज्य मिळण्याची आशा नको !

[ हंसतो.

**सोमेश्वर** : काय हो, हंसायला काय झालं ? ओंकारेश्वराला अभिषेक करून स्वराज्य मिळणार नाहीं तर मग काय पाटलोणी घालून आणि पावलोणी खाऊन स्वराज्य मिळणार आहे होय ? ओंकारेश्वर ही काय भानगड आहे हें तिथं गेल्याशिवाय कळायचं नाहीं !

**सदानंद** : मी सांगतों तुम्हांला सोमेश्वर, स्वराज्य कसं मिळेल तें ! शेतकऱ्यांचा उद्धार केल्याशिवाय हिंदुस्थानला स्वराज्य मिळणं शक्य नाहीं ! शेतकऱ्यांची आठवण झाली, कीं अंतःकरण कसं भडभडून येतं ! अरेरे, आमचे हजारों शेतकरी बांधव आज अन्नान्न करून तडफडून मरत आहेत ! पोटाला चतकोर तुकडा नाहीं, कीं नेसायला बोटभर लंगोटी नाहीं; अशी आमच्या शेतकऱ्यांची स्थिति असतांना तुम्ही सारे इकडे ब्राह्मणभोजनें घालतां

आहांत आणि बासुंदीपुरीवर ताव मारीत आहांत ? लाजा कशा वाटत नाहींत तुम्हांला ?

**त्रिभुवन** : हियर – हियर !

**सोमेश्वर** : काय हो, आम्ही ब्राह्मण तेवढे भोजनं झोडतों आणि तुम्ही मराठे काय पिचकारीनं आपल्या पोटांत हवा भरतां ? आमच्या पोटांत कावळे ओरडतात आणि तुमच्या पोटांत काय कोकिळा गात बसल्या आहेत होय रे ! अरे, आम्ही पोळ्या झोडतों तर तुम्ही नळ्या फोडतां ! एकूण एकच ! येऊन जाऊन तुमचं आमच्या बासुंदीवर लक्ष्य ! कांरे बाबांनो, आम्हीं तुमचं तें बोंबील कधीं मागितलं आहे का ? मग आमच्या बासुंदीवर तुमचा कां डोळा ! म्हणे शेतकरी लोक तडफडून मरत आहेत ! तुमचं तर सांजसकाळ अगदीं यथास्थित चाललं आहे ना ! शेतकऱ्यांना नेसायला बोटभर लंगोटी नाहीं आणि ( त्याचा नेकटाय धरून ) ही चार बोटांची लंगोटी गळ्याला कशाला गुंडाळली आहे हो तुम्हीं ! द्या कीं एकाद्या शेतकऱ्याला ही म्हणजे त्याची लाज तरी झांकेल !

**त्रिभुवन** : हें पहा सोमेश्वर, त्याचं राहूं द्या – मी सांगतों तुम्हांला स्वराज्य कसं मिळेल तें ! ओंकारेश्वराच्याच काय पण हिंदुधर्मांतील तेहतीस कोटी देवांच्या टाळक्यावर पाणी ओतून स्वराज्य मिळणें शक्य नाहीं ! स्वराज्य मिळण्याचा एकच मार्ग म्हणजे धर्मांतर ! हिंदुधर्म सोडा म्हणजे एका क्षणांत तुम्हांला स्वराज्य मिळेल !

**सोमेश्वर** : हिंदुधर्म सोडा – अहो, काय बोलतांय् काय ? हिंदुधर्म सोडल्या-नंतर मग स्वराज्याला काय जाळायचंय् ! स्वराज्य मिळालं नाहीं तरी बेहेत्तर – कल्पान्तापर्यंत आम्ही गुलाम राहूं – पण प्राण गेला तरी आम्ही आमचा हिंदुधर्म सोडणार नाहीं !

**त्रिभुवन** : तुम्ही प्राण गेला तरी हिंदुधर्म सोडणार नसलां, तर आम्ही प्राण गेला तरी हिंदुधर्मांत मरणार नाहीं ! हिंदुधर्मांत आम्ही जन्माला आलों याला आमचा नाइलाज आहे ! पण हिंदु म्हणून आम्ही खास मरणार नाहीं !

**सोमेश्वर** : मग तुम्ही थांबला आहांत कशासाठीं आतां हिंदुधर्मांत ? मी देखील सांगतों तुम्हांला कीं एक क्षणभर राहूं नका या आमच्या धर्मांत ! झटपट होऊन टाका काय तुम्हांला व्हायचंय् तें ! आज उद्यां हृदय बंद

पडून जर मेलांत तुम्ही, तर हिंदु म्हणून तुम्हांला सरणावर जाळायला लागेल आणि तुमचीं हाडं नदींत जाऊन पडतील! मुसलमान झालांत किंवा ख्रिस्ती झालांत म्हणजे खुशाल आरामशीर एकदांचे खड्डयांत तरी जाऊन पडाल!

**सदानंद** : खूप हिंदुधर्माचे अभिमानी आहांत तुम्ही! हिंदुधर्मातून त्यांना जायला सांगतां?

**सोमेश्वर** : हिंदुधर्माला शिव्या देणारे हे असले लोक हिंदुधर्मांत राहण्यापेक्षां कायमचे एकदां चालते झालेले बरें! कटकट नको! सहा कोटी अस्पृश्य गेले तरी वीस कोटी हिंदु तर खालीं उरताहेत! आजपर्यंत इतके लोक हिंदुधर्म सोडून चालते झाले! काय झालं आमचं वांकडं? एवढं कशाला— एकही हिंदु पृथ्वीतलावर उरला नाहीं तरी आमचा सनातन हिंदुधर्म अजरामरच रहाणार!

**त्रिभुवन** : शाबास! याला म्हणावं हिंदुधर्माचा अभिमान! अहो ओंकारेश्वर, चुकलों — सोमेश्वर — तुमचा हिंदुधर्म खुशाल कल्पान्तापर्यंत कवटाळून बसा — आम्हांला त्याची पर्वा नाहीं! अस्पृश्यता नष्ट करणें हें स्वराज्यसंपादन करण्यापेक्षांही आम्ही पवित्र समजतों. प्रत्यक्ष परमेश्वर जरी आमच्यापुढें उभा राहिला तरी आम्ही आमच्या धर्मांतराच्या निश्चयापासून परावृत्त होणार नाहीं!

**सोमेश्वर** : धर्मांतर केल्यानं तुमची अस्पृश्यता नाहींशी होईल असा तुम्हांला भ्रम आहे नुसता! महात्मा गांधी म्हणतात, अस्पृश्यता हा हिंदुधर्मावरील कलंक आहे! मी म्हणतों अस्पृश्यता हें हिंदुधर्माचें सनातन वैशिष्टय आहे. अस्पृश्यता हा कपाळावरचा कलंक नसून तें कपाळावरचं कुंकू आहे. त्यामुळें हिंदुधर्मांतील वर्णाश्रमपद्धतीचें सौंदर्य विशेष खुलून दिसतें. तुम्ही काय वाटेल तें करा, चंद्रसूर्याप्रमाणें अस्पृश्यता कायमची टिकून रहाणार! पूर्वजन्मीं केलेल्या पापाबद्दल अस्पृश्यता ही परमेश्वरानं तुम्हांला दिलेली जन्मठेपेची शिक्षा आहे. त्याला आम्ही काय करणार?

**त्रिभुवन** : पहा — पहा — कशी मनुस्मृतीची निशा चढली आहे या भटांना!

**सदानंद** : छे छे, सोमेश्वर, तुमच्यासारख्या सच्छील, सदाचारी ब्राह्मणांनीं आपल्या हरिजनबांधवांसंबंधीं असली भाषा वापरावी ही शरमेची गोष्ट आहे.

**सोमेश्वर** : हे हरिजन नाहींत–अरिजन आहेत अरिजन ! मी असं विचारतों तुम्हांला सदानंद, तुम्ही अस्पृश्यतानिवारणाची ओरड करतां एवढी ! पण अस्पृश्यता हल्लीं उरली आहे कोठें ? मारे आगगाड्यांतून मांड्याला मांड्या लावून सारे बसतां आहांत, हॉटेलांत एका टेबलावर बसून जेवताहांत, नाटक-तमाशे बरोबर बसून बघतां आहांत ? मग आतां पाहिजे काय तुम्हांला ? उपकार समजा कीं, पांच हजार वर्षे आम्ही तुम्हाला शिवलों नाहीं ते आतां शिवायला लागलों ! पण यांना हें नको आहे – नुसत्या भेटीबंदीची बेडी तोडून याचं समाधान व्हायचं नाहीं ! रोटीबंदीची, लोटीबंदीची आणि बेटीबंदीची बेडी तोडली म्हणजे मग यांचे ताबूत थंडे होतील ! अंगणांत बसूं दिलें तर म्हणे ओसरीवर बसूं द्या ! ओसरीवर बसूं दिलें तर म्हणतील माजघरांत शिरूं द्या ! कशाला रे ? पोरी पाहिजेत नाहीं का तुम्हांला आमच्या ? कंबरडीं मोडून टाकूं ! याद राखून असा !

**सदानंद** : अस्पृश्यतानिवारणाचा तुम्ही विपर्यास करीत आहांत ! तुमच्या स्वतःच्या घराचें माजघर राहूं द्या–पण निदान हिंदूंच्या सार्वजनिक देवळांत, किंवा तसं कशाला, मी म्हणतों तुमच्या कोटेश्वराच्या देवळांत तरी यांना जाऊं द्यायला काय हरकत आहे !

**सोमेश्वर** : पांच हजार वर्षें यांनीं देवाकडे कधीं ढुंकून पाहिलं नाहीं आणि आतां राजापूरच्या गंगेप्रमाणें देवाचं प्रेम यांना उचंबळून आलं काय ? तुम्हांला असं का वाटतं कीं देवाचं प्रेम आहे म्हणून यांची देवळांत शिरण्याची इच्छा आहे ? आणि आतां हे दुसऱ्या धर्मांत जात आहेत ते तरी काय देवाची पूजा करण्यासाठीं ? देवाचीच पूजा करायची तर हिंदुधर्मांत एकच काय पण म्हसोबापासून महादेवापर्यंत तेहतीस कोटी देव आहेत ! करा कीं वाटेल तेवढी पूजा ! दहा जन्म पूजा करीत बसलां तरी देव संपावयाचे नाहींत आमच्या धर्मांतले ! बाकीच्या दरिद्री धर्मांत काय एक एकच देव ! पण यांना देवाची पूजा करायला नको ! यांना देवळांत शिरून देवळाचा महारवाडा करायचाय् ! म्हणे आमच्या कोटेश्वराच्या देवळांत शिरूं द्या ! जसं कांहीं देवळांत शिरल्यानंतर हे आतां महादेवाच्या पिंडीलाच मिठी मारून बसणार आहेत !

**त्रिभुवन** : आणि तुम्ही सनातनी लोक देवळांत शिरतां ते तरी नंदीला मागून हात लावण्यापेक्षां जास्त काय करतां ?

**सदानंद :** तसं म्हणाल तर आम्ही सुशिक्षित हिंदु तरी कुठं कोणत्या देवळांत जातों आहोंत ! सारीं देवळं येथून तेथून ओस पडण्याची पाळी आली आहे !

**सोमेश्वर :** बेहेत्तर आहे सारीं देवळं ओस पडलीं तरी, पण एकाहि देवळाची पायरी चढूं देणार नाहीं आम्ही यांना !

**त्रिभुवन :** साहेब देवळांत शिरला तर तुम्हांला चालतो ! आणि आम्ही शिरलों तर तुमचं देऊळ बाटतं काय ?

**सोमेश्वर :** अर्थात्‌च ! अरे, साहेबाच्या गोष्टी तुम्ही कशाला सांगताय् ! साहेबाच्या आम्ही लाथा खातों म्हणून तुमच्या खाऊं काय ? श्रीशिवछत्रपतीनं आपल्या रक्ताचं पाणी करून आमचा धर्म राखला–आमचीं देवळं सुरक्षित ठेवलीं, तीं काय या लोकांना विटाळून देण्यासाठीं—

**त्रिभुवन :** बुरसलेल्या पोथ्यांचीं पानें चाळण्याऐवजीं थोडीं इतिहासाचीं पानें चाळा म्हणजे तुमच्या मठ्ठड डोक्यांत प्रकाश पडेल कीं, छत्रपति शिवाजीमहाराजांनीं गाईचं आणि तुमच्यासारख्या बैलांचं रक्षण केलं तें आम्हां महारांच्या मदतीनं ! तुमच्या शेंड्या आणि जानवीं शाबूत ठेवण्यासाठीं आम्हां महारांना आपलं रक्त सांडावं लागलं आहे ! महाराष्ट्रांतला दगडन् दगड हा महारांच्या रक्तानं रंगलेला आहे, तर महाराष्ट्राची माती ही उन्हातान्हांतून धांवणाऱ्या इमानी महारांच्या घामानं भिजलेली आहे ! महाराष्ट्र हें महारांचं राष्ट्र आहे म्हणूनच त्याला महाराष्ट्र म्हणतात ! तें तुम्हां मराठ्यांचं नाहीं आणि ब्राह्मणांचं तर नाहींच नाहीं !—

[ दिलीप प्रवेश करतो. दिलीपचें वय तेवीस चोवीस वर्षांचें आहे. त्याचा पोषाख संपूर्ण खादीचा आहे. त्याच्या हातांत एक पुडकें आहे.

**दिलीप :** अरे वा, अगदीं रंगांत आला आहे तुमचा वाद ! काय म्हणालांत त्रिभुवन ! महाराष्ट्र हें महारांचं आहे–मराठ्यांचं नाहीं ! नाहीं, त्रिभुवन, महाराष्ट्र हें आपणां सर्वांचें राष्ट्र आहे. तुमचं–आमचं–यांचं सर्वांचं ! म्हणूनच तें महाराष्ट्र आहे ! आपण सर्व एकाच राष्ट्राचीं आणि एकाच रक्ताचीं लेकरें आहोंत—

**सोमेश्वर :** हे आले हिंदुधर्माचे दुसरे शत्रु ! या असल्या सबगोलंकारी

सुधारकांपेक्षां हे उघडाउघड धर्मांतरवादी महार पतकरले ! काय हो ग्रामगांधी, तुरुंगांतून केव्हां सुटलांत तुम्ही !

**दिलीप** : कालच संध्याकाळीं !

**सोमेश्वर** : तुरुंगांतून सुटलांत आणि अंगानेंही चांगलेच सुटलांत कीं ! आणि तुमचा चरखा कुठं आहे ?

**दिलीप** : कसला चरखा ?

**सोमेश्वर** : तुमचा चरखा हो ! एका वर्षांत स्वराज्य मिळवायचं तुमचं तें लाकडी यंत्र ? तें 'चरखा चला चला के'—? तें कां बरोबर घेऊन नाहीं हिंडत ! चरखा फिरवतात लेकाचे चरखा ! खारका खा खारका. म्हणजे स्वराज्य मिळेल !

**सदानंद** : मला वाटलं तुम्ही येत नाहीं आज !

**दिलीप** : वा, अलकेचा आज वाढदिवस, आणि मी कसा नाहीं येणार ! कुठं आहे अलका ! मी मधाशींच यायला पाहिजे होतों—पण माझं व्याख्यान होतं त्या आपल्या या कॉलेजांत—रोटीबंदीची बेडी कशी तोडतां येईल या विषयावर !

**त्रिभुवन** : झाली का तुमची सुटल्याबरोबर व्याख्यानबाजी सुरू ?

**सोमेश्वर** : आणि विषय काय, तर म्हणे रोटीबंदीची बेडी कशी तोडतां येईल ? असल्या पांचट आणि अधार्मिक विषयावर व्याख्यानें देऊन तुम्हीं लोकांनीं कॉलेजांतील कारटीं बिघडवून टाकलीं आहेत ! आमचं पोरगं तर काय विचारूं नका ! हात टेकले मीं त्याच्यापुढें ! गुरुजनासंबंधीं किंवा वडील माणसासंबंधीं एकाला आदर असेल तर शपथ ! आमच्या वेळीं प्रोफेसर समोरून आले तर गटाराच्या कडेनं मान खालीं घालून आम्ही भीतभीत जायचे ! आणि हल्लीं प्रोफेसराच्या बायकांना धक्के देऊन पोरं कॉलेजांत शिरतात ! काय सांगावं ! नुसती सिंगलबाजी आणि टिंगलबाजी करायला पाहिजे ज्याला त्याला ! परवां तर काय विषय होता चर्चेला कीं म्हणे, स्त्री ही धोंड आहे किंवा काय ? अरे, हा का विषय आहे का थट्टा !

**त्रिभुवन** : पण तुमचं काय मत आहे या विषयावर ?

**सोमेश्वर** : आमचं मत अगदीं स्पष्ट आहे. स्त्री ही धोंड तर नाहींच नाहीं, पण ती एक नागपंचमीचं गोड दिंड आहे !

**सदानंद** : सनातनी असून देखील तुम्ही बरेच रंगेल आहांत कीं !

**सोमेश्वर** : आम्ही सनातनी लोकांनीं काय आपल्या संसाराचा संन्यास घेतला आहे असं तुम्हांला वाटतं ? तसे आम्ही मूळचे फार रंगेल. पण या सुधारकांचे हे धार्मिक अनाचार बघून आमचा जीव वैतागून गेला आणि म्हणून आमचा स्वभाव असा चिडका व रागीट झाला आहे.

**दिलीप** : तुम्ही आमच्या सहभोजनाला या म्हणजे तुमची प्रकृति आणि स्वभाव अगदीं फक्कड होईल !

**सोमेश्वर** : मी आणि सहभोजनाला येऊं ! सहभोजन करण्यापेक्षां मी एखाद्या विधवेबरोबर सहगमन करीन ! तुम्ही ( त्रिभुवनकडे बोट करून ) यांनाच बोलवा सहभोजनाला—

**त्रिभुवन** : अहो, मी अस्पृश्य असलों तरी यांची सहभोजनाची चळवळ मला मुळींच पसंत नाहीं ! सहभोजनाचीं पानें आमच्या तोंडाला पुसून आम्हांला हिंदुधर्मात जखडून ठेवण्यासाठीं धूर्त लोकांनीं ही युक्ति काढली आहे. आतांपर्यंत आम्हांला तुम्हीं उष्टं खरकटं खायला घातलंत—आतां हे झुणकाभाकर खाऊं घालायला आलेत !

**सोमेश्वर** : बघा—बघा—कसे आहेत हे तुमचे हरिजनबंधु ! असल्या कृतघ्न लोकांना फुकटचं खायला घालून तुम्हीं हे निव्वळ सर्प पोसतां आहांत.

**दिलीप** : अस्पृश्यता हें जातिभेदाच्या विषारी वृक्षाला आलेलें जहरी फळ आहे. जातिभेदाचा वृक्षच समूळ तोडून टाकला म्हणजे अस्पृश्यता आपोआपच मरून जाईल. केवळ अस्पृश्यतानिवारणासाठींच नव्हे तर हिंदुसमाजांतील सर्व जातिभेदांचं उच्छेदन करून हिंदुधर्म बलिष्ठ करण्यासाठीं म्हणूनच आम्हीं ही झुणकाभाकर सहभोजनाची चळवळ काढली आहे.

**सोमेश्वर** : खुद्द भगवंतांनं बांधलेला हा चातुर्वर्ण्याचा कडेकोट किल्ला असल्या सहभोजनाच्या फुसकट सुरुंगानं कोसळून पडेल म्हणतां ! खपरी उडायची नाहीं एवढी सुद्धां ! हें पहा, दिलीप, हा झुणकाभाकर—सहभोजनसंघ काढण्यापेक्षां भिन्न भिन्न जातींत सहविवाह घडवून आणण्यासाठीं एक 'लुगडें—धोतर—संघ' काढा आतां—

**त्रिभुवन** : काढा, काढा, लुगडें धोतर संघ जरूर काढा ! या बाबतींत

तुमचं आमचं एक मत. असा संघ काढणार असलां तर आम्ही धर्मांतर करण्याचं तहकूब करूं !

**दिलीप** : जातिभेदाचें उच्छेदन करायला जिथें आम्ही निघालों आहोंत तिथें सहविवाहाच्या भयाचा बागुलबुवा आम्हांला दाखविण्यांत काय अर्थ आहे ! सहभोजनाच्या पावलावर पाऊल टाकून सहविवाह येणारच आंत !

**सोमेश्वर** : मग तेंच तर मी ओरडतों आहें ! जातिभेद मोडून टाकण्याऐवजीं तुम्ही आणखी एक समसमानी जात निर्माण करीत आहांत, दुसरं काय ? आज झुणकाभाकरीचं सहभोजन आहे, पण त्याच्या मागोमाग उद्यां मांसभोजन सुरू होणारच ! आज डाळवांगं असलं तर उद्यां मटणाचा रस्सा आलाच पाहिजे. आणि अशा तऱ्हेनें तुम्ही ब्राह्मण उद्यां मद्यमांस खाऊं लागलांत तर पांच टक्के ब्राह्मणजात ब्राह्मणेतरांच्या अफाट महासागरांत नाहींशी व्हायला कितीसा वेळ लागणार आहे ?

**दिलीप** : हिंदुधर्म हा कांहीं ब्राह्मणांचा धर्म नाहीं. सर्व हिंदूंचा धर्म तो हिंदुधर्म. अशा व्यापक हिंदुत्वाचा अभिमान धरा. ब्राह्मण्याचा कसला आकुंचित अभिमान धरतां आहांत ? म्हणूनच मी म्हणतों कीं जातिभेद मरेल तरच हिंदुधर्म तरेल !

**सदानंद** : ( सोमेश्वराकडे बघून ) आणि यांचं ब्राह्मण्य तरी काय आहे ? कपाळाला भस्माचे पट्टे आणि कमरेला धाबळीमुकटे, हें यांचें ब्राह्मण्य ! चांगला व्याजबट्ट्याचा धंदा करून पैसे मिळवतात आणि पोराला इंग्रजी शिकायला कॉलेजांत पाठवतात ! हे कसले ब्राह्मण ! त्यापेक्षां आम्ही मराठे बरे !

**सोमेश्वर** : अहो ब्राह्मणेतर, म्हटलं मी ब्राह्मण आहें. आम्हीं काय वाटेल तें केलं तरी आम्हीं तुमच्यापेक्षां श्रेष्ठच राहणार ! 'जरी ब्राह्मण झाला भ्रष्ट तरी म्हटलं तिन्ही लोकीं श्रेष्ठ !' आम्हीं कसे नाहीं तरी सत्तर टक्के ब्राह्मण ठरूं—पण तुम्ही पांच टक्के तरी क्षत्रिय आहांत काय ? कोणतं शस्त्र धरतां येतं तुम्हांला ? सकाळीं स्वतःची हजामत करतांना हातांत वस्तरा धरतां म्हणून तुम्हांला क्षत्रिय म्हणायचं होय ? तें देखील पांच ठिकाणीं कापून घेत असाल !

**त्रिभुवन** : तसं म्हणाल तर हे दिलीप ब्राह्मण तर राहूं द्याच, पण हिंदु तरी आहेत का ? यांना ना शेंडी ना घेरा ! ना जात ना जानवं ! कधीं संध्या करीत नाहींत कीं कधीं देवळांत जात नाहींत ! गाईला म्हणतात उपयुक्त पशु !

वाटेल त्या अहिंदुबरोबर जेवतात. वाटेल तें खातात ! तरी देखील यांना हिंदुत्वाचा कोण अभिमान !

**सोमेश्वर :** तुम्ही काळजी करूं नका—मी यांना हिंदु म्हणण्याला कदापि तयार होणार नाहीं ! त्यापेक्षां हिंदुधर्माला शिव्या देणारे तुमच्यासारखे लोक फार बरे ! हिंदुधर्मात राहून या लोकांनीं एवढा भ्रष्टाकार माजविला आहे, कीं सात जन्म गोमूत्र पीत राहिले तरी तरी हे कधीं शुद्ध होणार नाहींत !

**दिलीप :** हिंदुधर्म हा शेंडींत नाहीं कीं जानव्यांत नाहीं ! धर्म हा जर केसांत आणि दोऱ्यांत असता तर तो कात्रीच्या फटकाऱ्याबरोबर नाहींसा करतां आला असता. हिंदुधर्म हा धाबळींत नाहीं कीं मुकट्यांत नाहीं ! सोवळ्यांत नाहीं कीं संध्येंत नाहीं ! देवळांत नाहीं कीं तीर्थांत नाहीं ! हिंदुधर्म हा तेहतीस कोटी देवांची पूजा करण्याचा धर्म नसून तीस कोटी लोकांची सेवा करण्याचा धर्म आहे ! हिंदुधर्म हा देवधर्म नसून राष्ट्रधर्म आहे ! हिंदुस्थानला जो आपली मातृभूमि समजतो, आणि हिंदुस्थान स्वतंत्र करण्यासाठीं ज्याचा आत्मा रात्रंदिवस तळमळतो तो हिंदु !

भारतभूमी नाचवि ज्याच्या प्रेमाचा सिंधु,
तोच खरा हिंदु !

हिमालयाचा भव्य मुकुट तो शोभवि शीर्षाला,
गंगायमुना पवित्र सरिता भूषविती भाला,
तो हा भारत नाचवि ज्याच्या प्रीतीचा सिंधु
तोच खरा हिंदु ! १

जिथें निनादे ऋषिश्वरांची अजुनि वेदवाणी,
वीरवरांच्या पराक्रमाची अखंड जी खाणी,
आर्यभूमि ती नाचवि ज्याच्या भक्तीचा सिंधु
तोच खरा हिंदु ! २

सुवर्णभूमी म्हणुनि जियेची त्रिखंडभर कीर्ती,
अर्ध्यापोटीं तिथें झगडती आज तीस कोटी,
त्या भूमींतिल गरिब लेकरां जो मानी बंधु !
तोच खरा हिंदु ! ३

दास्यमग्न ही जरी आजला आर्यांची भूमी
चिंतितसे परि रात्रंदिन जो तिला मातृभूमी
सिद्ध तिच्यास्तव सांडाया जो रक्ताचे बिंदु
तोच खरा हिंदु ! ४

तुम्हांला असं वाटतं काय, कीं मेल्यानंतर मोक्ष मिळविण्यासाठीं आम्ही धर्माच्या मागें लागलों आहोंत ! मेल्यानंतर काय व्हायचं असेल तें होवो—मोक्ष मिळो वा न मिळो ! पुन्हां जन्म येवो वा न येवो; पण या जन्मांत—या आयुष्यांत आणि याच डोळ्यांदेखत देश स्वतंत्र होवो म्हणून धर्माचें बळ आम्हांला पाहिजे आहे.

[ अलका व माणिक येतात.

**अलका** : बाबांनीं दिवाणखान्यांत पाय टाकला तर ते अगदीं चकितच होऊन जातील. मला वाटतं बाबा येईपर्यंत आपण आतां बाहेरच बसूं—बेअरर—बरें का सदानंद—( दिलीपला बघून ) कोण ?

**दिलीप** : ओळख कोण आहे तो !

**अलका** : दिलीप—दिलीप—बाय जोव्ह ! म्हणजे मला खरंच वाटत नाहीं ! आलास कधीं आणि किती बदलला आहेस तूं !

[ ती त्याच्याकडे एकसारखी पहाते.

**त्रिभुवन** : हं, सदानंद, चला, उचला पाय इथून आतां—

[ गडी येतो.

**गडी** : बाहेर फराळाची व्यवस्था केली आहे.

**अलका** : असं का ? हो–म्हणजे फराळाची व्यवस्था ना–सदानंद, तुम्ही जा ना यांना घेऊन–मी आलेंच इतक्यांत—

**सदानंद** : तें आलें ध्यानांत. चला सोमेश्वर—

[ सोमेश्वर, सदानंद, त्रिभुवन, माणिक व गडी जातात.

**अलका** : मला अजून खरं वाटत नाहीं ! क्षणभर मीं तुला ओळखलंच नाहीं ! मला वाटलं—

**दिलीप** : कुणीतरी पट्टेवाल्याची नोकरी मागायला आला, असंच ना !

**अलका** : चला ! तसं नाहीं–पण खरंच, किती किती बदल झाला आहे तुझ्यांत !

**दिलीप** : तुझ्यांत काय कमी बदल झाला आहे !

**अलका** : पण मी इंग्लंडलाच गेलें होतें मुळीं ! पांच सहा वर्षें इंग्लंडला राहिलेल्या माणसांच्या पोषाखांत एवढा फरक व्हायचाच !

**दिलीप** : मग चार पांच वर्षें तुरुंगांत राहिलेल्या माणसांच्या पोषाखांत एवढा फरक कां होऊं नये ?

**अलका** : मला बोटीवर पोहोंचवायला आलां होतां त्यावेळचा तुझा तो पोषाख–तो ऐटदार रेशमी सूट–तो झोकदार टाय–ती डौलदार हॅट–तो अत्तराचा घमघमाट !

**दिलीप** : देशद्रोही विलासाचीं तीं पापी वस्त्रें मीं त्याच वेळीं जाळून टाकलीं– आतां त्याची कां आठवण करून देतेस ?

**अलका** : आणि त्याबरोबर आपल्या महत्त्वाकांक्षाहि जाळून टाकल्यात ! मी गेलें त्याच्या मागल्याच बोटीनें तुम्ही तिकडे येणार होतां ना ! ऑक्सफर्ड विश्वविद्यालयाची इतिहासविषयांत एम्. ए. ची पदवी घेऊन मग कोठल्या तरी कॉलेजांत इतिहासाचा प्रोफेसर होण्याची तुमची महत्त्वाकांक्षा होती हें मला ठाऊक होतें.

**दिलीप** : ज्या दिवशीं हिंदुस्थानचा किनारा सोडणार त्या दिवशींच महात्मा गांधींनीं आपल्या अनत्याचारी संग्रामाचें रणशिंग फुंकलें ! त्याबरोबर विलायतेला जाण्यासाठीं तयार केलेल्या साऱ्या सामुग्रीची, सगळ्या पोषाखाची, आणि आयुष्यांतील पूर्वीच्या आकांक्षांची होळी करून मी त्या रणसंग्रामांत

सैनिक म्हणून दाखल झालों. देशाच्या स्वातंत्र्यासाठीं लढणाऱ्या सैनिकाचा हा गणवेष तेव्हांपासून मीं धारण केला आहे.

**अलका :** देशप्रेमाचा फारच मोठा मनोगंड तुम्हांला झाल्यासारखा दिसतो आहे. असला दरिद्री वेष अंगावर चढविल्याशिवाय देशसेवा करतां येत नाहीं असं थोडंच आहे ! या पोषाखानं मला देशसेवा करतां यावयाची नाहीं असं का तुम्हांला वाटतं ?

**दिलीप :** अर्थातच, मोलाचीं महावस्त्रें अंगावर घालून दरिद्री देशाची पूजा कशी करतां येईल ? मातीनें आणि चिखलानें मलिन झालेल्या शेतकऱ्यांची, काबाडकष्टाच्या घामानें मळकटलेल्या मजुरांची आणि कारखान्याच्या धुरानें काळवंडलेल्या कामकऱ्यांची सेवा, परीटघडीचे तलम कपडे घालून का कोणाला करतां येईल ? लक्तरें अंगावर घातल्याशिवाय देशसेवेची दीक्षा घेतां येत नाहीं !

**अलका :** देशासाठीं एवढ्या त्यागाची जरूरी आहे असं मला नाहीं वाटत ! बाबा इतकीं वर्षे देशसेवा करीत आहेत; पण घरादाराचा सत्यनाश करून तुरुंगांत जाण्याचे दरिद्री चाळे त्यांनीं कधींच केले नाहींत !

**दिलीप :** आरामखुर्चीवर बसून 'टाइम्स' वाचतां वाचतां आणि चिरूट ओढतां ओढतां देशासंबंधीं विचार करणाऱ्या शिळोप्याच्या देशभक्तांचा काळ केव्हांच संपून गेला आहे. स्वातंत्र्यासाठीं तळहातावर शिर घेऊन लढणाऱ्या देशभक्तांचा हा काळ आहे. देशाच्या प्रेमासाठीं सर्वस्वाचा त्याग करण्याची आज तयारी पाहिजे !

**अलका :** असं म्हणतां म्हणतां उद्यां तुम्ही माझ्यावरील प्रेमाचा देखील त्याग करावयास तयार व्हाल !

**दिलीप :** होईनही कदाचित् ! नाहीं म्हणून कुणीं सांगावं ! देशासाठीं केवढाही अलौकिक त्याग अपुराच ठरेल !

**अलका :** ज्यावेळीं तुम्हीं मला प्रेमाचीं वचनें दिलींत त्यावेळीं तुमची अशी वृत्ति नव्हती ! त्यावेळीं तुम्ही माझ्या प्रेमासाठीं वाटेल तो त्याग करण्याची भाषा बोलत होतां ! बोला, दिलीप, पहिल्याप्रमाणेंच तुमचं माझ्यावर प्रेम असेल तर आज तुम्ही माझ्या प्रेमासाठीं कोणता त्याग करायला तयार आहांत ?

**दिलीप :** तूं तरी माझ्या प्रेमासाठीं कोणता त्याग करायला तयार आहेस,

अलका ! तूं आणि मीं एकमेकांसाठीं त्याग करण्यापेक्षां आपण दोघे मिळून देशासाठीं सर्वस्वाचा त्याग करून आपलें प्रेम सिद्ध करूं !

त्यागुनि चल स्वार्थ आपुला । त्वरित या काळा,
प्रेमें न्हाऊं, वाहूं । तनमन देशाला !
प्रणया नच वेळ मना । देशाविना न चिंतन
आत्मार्पण एकच हें । सुखवी जिवाला ! १

त्या त्यागाची तुला दीक्षा देण्यासाठींच मी हें पवित्र वस्त्र घेऊन आज इथं आलों आहें.

[ पुडकें दाखवतों.

**अलका** : हें काय—

**दिलीप** : तुझ्या वाढदिवसासाठीं मीं आणलेली भेट—

**अलका** : तुम्हीं आणलेली ? खरंच ! बघूं द्या–बघूं द्या मला—

**दिलीप** : आणि तुला आवडली नाहीं तर !

**अलका** : तुम्हीं आणलेली जिन्नस–आणि मला आवडणार नाहीं ! असं होईल तरी कसं ! दाखवा मला लौकर—

[ दिलीप पुडकें सोडून आंतून एक खादीचें पातळ काढतो.

**अलका** : ( आश्चर्यचकित होऊन ) म्हणजे–हें काय ?—

**दिलीप** : हेंच तें देशसेवेचें महावस्त्र !

**अलका** : खादीचें पातळ, मला आणलेंत हें ?

**दिलीप** : अर्थात्‌च !

**अलका** : मला वाटलें माझ्या मोलकरणीला ! ( उपहासानें मोठमोठ्यानें हंसते ) तुम्ही मला समजलांत काय ? हें तरट अंगावर घालून मी सोंगासारखं

गांवांतून हिंडूं म्हणतां ! घेऊन जा ! बूट पुसायला देखील मी याच्यापेक्षां चांगला कपडा वापरतें !

[ फेकून देते.

**दिलीप** : कसली घमेंड चढली आहे तुला ! टेम्स नदीच्या पाण्याचा कैफ तुझ्या डोळ्यांवरून अजून उतरला नाहीं ! उचल तें पातळ ! उचल ! हा माझा अपमान नसून हा राष्ट्राचा,' राष्ट्राच्या गरिबीचा, दारिद्याच्या कष्टाचा अपमान आहे ! हा मी कधींहि सहन करणार नाहीं ! उचल तें—आणि या पवित्र वस्त्राची विटंबना केल्याबद्दल पायां पड त्याच्या—

[ मोठ्या कष्टानें अलका पातळ घ्यायला वांकतें. तों बाहेर मोटरचें शिंग वाजतें. अलका तें एकून एकदम आनंदानें उभी रहाते.

**अलका** : बाबा आले — बाबा आले — ( दिलीपला ) मुख्य प्रधानाची मुलगी असल्या गोणपाटाला हातानें स्पर्श करीत नाहीं — पायानें !

[ पातळाला लाथ मारते व बाहेर धांवत जाते. दिलीप गोंधळल्यासारखा होतो. बाहेर गलगा होतो. तसा तो त्वेषानें बाहेर चालता होतो. थोड्या वेळानें सर गुरुनाथ, अलका, सोमेश्वर, त्रिभुवन, माणिक, सदानंद, एक सरकारी पट्टेवाला इ. मंडळी प्रवेश करतात.

**सोमेश्वर** : शेवटीं आम्ही म्हणालों तसं झालं !

**सदानंद** : आम्हीं तर हें भविष्य कित्येक दिवसांपूर्वी करून बसलों होतों !

**गुरुनाथ** : इतक्या लौकर या गोष्टी घडून येतील अशी मला कल्पना देखील नव्हती. राजकारणांत काय केव्हां घडेल हें सांगतां यायचं नाहीं.

**अकला** : काय म्हणाले गव्हर्नरसाहेब —

**गुरुनाथ** : म्हणणार काय ? गेल्याबरोबर मुख्य प्रधान म्हणूनच त्यांनीं माझं स्वागत केलं व मंत्रिमंडळाची घटना करण्याची मला विनंति केली.

**त्रिभुवन** : मंत्रिमंडळांत आमच्या अस्पृश्यवर्गाचा प्रतिनिधी आहे कीं नाहीं !

**सोमेश्वर** : मंत्रिमंडळांत तुम्हां लोकांचं काय काम आहे हो ? तें काय ' दे दान सुटे गिराण ' आहे होय ?

**सदानंद** : या इलाख्याचे मुख्य प्रधान म्हणून मराठा लीगतर्फे मी आपलें

प्रथम अभिनंदन करतों. गेल्या निवडणुकींत माझें जप्त झालेलें डिपॉझिट परत मिळण्याबद्दल आपण खटपट कराल अशी आशा आहे.

**सोमेश्वर** : सनातन स्वराज्यसंघातर्फे आणि आतां बंद असलेल्या 'मुष्टिमोदक' पत्राचा संपादक म्हणून मी आपलें अंतःकरणपूर्वक अभिनंदन करतों. आपली कारकीर्द दीर्घ काल टिको व ती सुखाची होवो म्हणून ओंकारेश्वराला आम्ही लौकरच अभिषेक सुरू करूं.

**त्रिभुवन** : धर्मांतरवादी अस्पृश्यांतर्फे मी आपलें अभिनंदन करतों. धर्मांतर केल्यानंतरही आमच्या अपृस्यांचे पूर्वीचे हक्क कायम राहातील अशाबद्दल आपण खटपट कराल अशी आशा आहे.

**गुरुनाथ** : मित्रहो, मी आपल्या सर्वांचा आभारी आहें. हा माझा स्वतःचा गौरव नसून आमच्या राजकारणाचा – आमच्या देशसेवेचा गौरव आहे. असहकारितेच्या सांथीनें मोठमोठ्या पुढाऱ्यांनीं आपआपलीं मतें आणि पगड्या फिरविल्या व डोक्यावर नाना रंगांच्या टोप्या चढवल्या ! पण आमचीं मतें आणि आमचा पोषाख गेलीं सतरा वर्षें आहे तसा आम्हीं कायम ठेवला ! वाटेल त्या थट्टा व चेष्टा आम्हीं सहन केल्या. त्या साऱ्या तपश्चर्येचें हें फळ आहे असें आम्ही मानतों.

[ पट्टेवाला येतो.

**पट्टेवाला** : बाहेर कांहीं पुढारी मंडळी भेटायला आली आहेत.

**गुरुनाथ** : येऊं द्या – येऊं द्या त्यांना —

[ चार पांच मंडळी येतात, त्यांत खा. सा. कादरखान आहेत.

**सर्वजण** : फार आनंद झाला आम्हांला. आपलें अभिनंदन करायला आलों आहोंत आम्ही.

**गुरुनाथ** : आपला सर्वांचा मी फार ऋणी आहें.

**१ गृहस्थ** : ( त्यांना हार घालीत ) हनुमान मोटारसंघातर्फे मी हा हार आपल्याला घालतों.

**२ गृहस्थ** : ( हार घालीत ) हा काळभैरव बोर्डिंग हाऊसतर्फे हार.

**३ गृहस्थ** : संततिनियमनसंस्थेतर्फे मी आपल्याला धन्यवाद देतों.

**कादरखान** : मी खानसाहेब कादरखान. येथील फर्मास विड्यांचा सुप्रसिद्ध

**कारखानदार.** आमच्या कारखान्यांतला माल आपल्याला भेटीला घेऊन आलों आहें.

[ एक विड्यांचें बंडल त्यांना देतो.

**गुरुनाथ :** सोमेश्वर, हें तुम्हांला उपयोगी पडेल.

[ त्यांना देतो.

**कादरखान :** विनंति आपल्याला एवढीच करायची कीं, ऑनररी मॅजिस्ट्रेटची जागा एखादी मोकळी झाल्यास आपण माझें नांव अवश्य विचारांत घ्यावें.

**गुरुनाथ :** मित्रहो, आपण सर्वांनीं व्यक्त केलेल्या भावनांबद्दल मी आपला कृतज्ञ आहें. आपणां सर्वांचें जर असेंच सहाय्य मिळेल तर हां हां म्हणतां लोकपक्षाची धुळधाण उडवून टाकूं. आहे काय ?

[ बाहेर गलगा – 'लोकपक्षाचा जयजयकार असो ! मंत्रिमंडळाचा धिक्कार असो ! इन्क्लिाब झिंदाबाद !' सगळे चकित होतात. पट्टेवाला धांवत धांवत येतो.

**पट्टेवाला :** खादीवाले लोक आंत शिरून दंगा करताहेत !

**गुरुनाथ :** इथं कशाला आलास ? धांवत जा – पळ दरवाज्यांत ! लाथ मारून हांकून दे एकेकाला —

[ तो जातो. इतक्यांत दिलीप, हातांत तिरंगी निशाण घेतलेला कल्याण, जयंती व इतर लोकपक्षीय स्वयंसेवक व स्वयंसेविका आंत शिरतात.

**स्वयंसेवक :** लोकपक्षाचा जयजयकार ! मंत्रिमंडळाचा धिक्कार ! इन्किलाब झिंदाबाद !

**गुरुनाथ :** पट्टेवाला, कसे शिरले हे – पोलिसांना बोलवा !

**अलका :** दिलीप – तुम्ही !

**गुरुनाथ :** कोण दिलीप ! तुमचा नादानपणा आतां या थराला आला !

**सोमेश्वर :** अं, आणि हा कोण ? कल्याण ! गद्धया, तूं कसा इथं !

**त्रिभुवन :** जयंती, तूं यांच्यांत —

**सोमेश्वर :** माझं कारटं – आणि या लोकांत —

**त्रिभुवन :** माझी बहीण आणि असल्या मंडळींत !

**कल्याण :** मागं सरा ! तुम्ही बाप असलांत तर ते घरीं ! राष्ट्राच्या अब्रूचा प्रश्न आहे हा !

**जयंती :** खाजगी नातीं आम्ही ओळखत नाहीं !

**दिलीप :** शांत रहा. तुम्हीं मंत्रिपदें स्वीकारून लोकपक्षाचा आणि लोकमताचा उपमर्द केला आहे ! तुम्हीं राष्ट्राचा अपमान केलेला आहे !

**गुरुनाथ :** तुमच्या असल्या गुंडगिरीला घाबरून जाणारा मी नाहीं ! कौन्सिलांत शिरून आणि अधिकाराच्या जागा नाकारून तुम्हीं आपल्या मतदारांचा विश्वासघात केला आहे !

**कल्याण :** आम्हांला घटना मोडून टाकायची आहे ! आम्हांला राष्ट्रीय पेंचप्रसंग निर्माण करायचे आहेत !

**सोमेश्वर :** थांब लेका, तुझा पेंचप्रसंग काढतों !

**कल्याण :** मागें सरा – माझ्या हातांत राष्ट्रीय निशाण आहे ! निशाणाला हात लावाल तर मुडदा पाडीन एकेकाचा !

**कादरखान :** तूं घटना मोडतो होय रे ! आमच्या साहेबाच्या घटनेला हात लावशील तर कंबरडं मोडून टाकूं. आम्ही कारखानदार आहोंत विड्यांचे, खुंटावरचे ते नाहींत !

**दिलीप :** आतांच्या आतां तुम्हीं मंत्रिपदाचा राजिनामा दिला नाहींत, तर तुमच्या शिराळशेटी मंत्रिमंडळाचा आम्ही निषेध करूं !

**कल्याण :** तुम्हीं सरकारचे बगलबच्चे असून लोकांचे शत्रू आहांत !

**अलका :** दिलीप, दिलीप —

**गुरुनाथ :** देशाच्या हितासाठीं जर लोकपक्षानें मंत्रिपदें झिडकारलीं असतील तर देशाच्या हितासाठीं आम्हीं मंत्रिपदें स्वीकारलेलीं आहेत ! तुम्ही मतदारांच्या डोळ्यांत धूळ टाकून त्यांच्याशीं द्रोह करीत आहांत —

**दिलीप :** लोकमताचा पाठिंबा नसतांना स्वतःचा स्वार्थ साधण्यासाठीं तुम्ही राष्ट्राशीं द्रोह करीत आहांत !

**कल्याण :** राष्ट्रद्रोह्यांचा धिक्कार असो !

**अलका** : ( दिलीपच्या पायाशीं वांकून ) दिलीप, माझ्यासाठीं–माझ्या प्रेमासाठीं—

**दिलीप** : आपल्या वैयक्तिक प्रेमाचा या ठिकाणीं कांहीं संबंध नाहीं. मंत्रिपदाचा जर यांनीं राजिनामा दिला नाहीं तर मी तुझ्या प्रेमावर या क्षणींच पाणी सोडायला तयार आहे असं समज !

[ तिला दूर झिडकारतो.

**स्वयंसेवक** : लोकपक्षाचा जयजयकार ! वंदे भारतम् !

पडदा

# २

कल्याण एक वर्तमानपत्र वाचीत प्रवेश करतो. वाचतां वाचतां तो स्वतःशींच हंसत आहे. इतक्यांत मागून दिलीप येतो.

**दिलीप** : कां हो, कसली खूष खबर वाचतांय् ?

**कल्याण** : आमच्या कॉलेजच्या विश्वाची वार्ता. अशा गंमती असतात एकेक याच्यांत. हें बघा—( वाचतो ) " काल रोजीं कॉलेजमध्यें हत्तीचीं पिलें फिरकतांना पाहून कांहीं विद्यार्थी घाबरून पसार झाले. तपासाअंतीं तीं हत्तीचीं पिलें नसून ज्यूनिअर बी. ए. मधल्या दोन विद्यार्थिनी होत्या असें कळतें. ' ( हंसतो ) आहे कीं नाहीं गहजब ? ही दुसरी बातमी पहा. ( वाचतो ) ' परवा इंटरच्या वर्गात एक मोठा काळा भुंगा खिडकींतून आंत घुसला व मध चाखण्यासाठीं वर्गातील एका कमलिनीवर जाऊन बसला ! '

**दिलीप** : असल्या टारगट बातम्या छापतात हीं पत्रें ? मी दोन वर्षें तुरुंगांत असल्यानें हा कॉलेजांतील बातम्यांचा बाष्कळपणा इतका बोकाळला असेल याची कल्पना नव्हती मला !

**कल्याण** : देशभक्त झाल्यामुळें तुमचा रंगेलपणा अकालींच नाहींसा झालेला दिसतो आहे. हा म्हणे बाष्कळपणा ! अहो, हा कॉलेजच्या स्वर्गीय सृष्टींतला रोमान्स आहे ! तुम्हांला माहीत आहे, आजकालचीं कॉलेजें म्हणजे प्रणयाचीं नंदनवनें आहेत. अहाहा, कॉलेजची आठवण झाली कीं काळीज गलबलून जातें ! रंगीबेरंगी पातळें नेसल्यानें इंद्रधनुष्याप्रमाणें डोळे दिपविणारा तो

पोरींचा घोळका—काळजाची कुलपी मलाई बनविणारें तें त्यांचें मोहक खिंकाळणें, प्राण कासावीस करणारा तो पावडरचा आणि अत्तरचा भपकारा—नितंबावर नागिणीप्रमाणें लोळणारे ते लांबलचक काळेभोर शेपटे, गुलाबी गालावर प्रकाश पाडणारे ते लांबोळे डूल, कानावर वळवलेले ते केसांचे कमानदार फुगे, ती हाडकुळ्या बोटांचीं रंगवलेलीं टोकदार नखें, त्या पारदर्शक आखूड मुठीच्या छत्र्या, ते चुरमडलेले चतकोर हातरुमाल—त्या चपला – ते बूट – त्या बॅगा – छे – छे – नुसत्या आठवणीनेंच वेड लागायची पाळी येते !

**दिलीप** : तूं कॉलेजमध्यें राहून एवढाच अभ्यास केलेला दिसतो आहेस !

**कल्याण** : मग काय तर ! मुलींच्या मागल्या बाकावर कायमचा मुक्काम करून बसणारे आमच्यासारखे रंगेल विद्यार्थी दुसरा कोणता अभ्यास करणार ? कॉलेजांत असतांना प्रियाराधन हा माझा ऐच्छिक विषय होता. उगाच नाहीं एकेका वर्गात तीन तीन वर्षे काढलीं. पहिल्या वर्गात चिक्कार मुली असतात म्हणून त्या वर्गात तर मी चार वर्षे तळ देऊन होतों.

**दिलीप** : तुझ्या वडलांना माहीत नाहींत वाटतें हे तुझे उद्योग ?

**कल्याण** : असले माहीत म्हणून त्यांची कोण परवा करतो आहे ! खरें पहातां ते तर माझ्या कॉलेजमध्यें जाण्याच्या भयंकर विरुद्ध ! त्यांच्या मतें मी टि. म. चा वा. वि. व्हावं असं होतं !

**दिलीप** : टि. म. चा वा. वि. ! ही काय भानगड आहे ?

**कल्याण** : देशभक्त असून तुम्हांला टि. म. चा वा. वि. माहीत नाहीं ! टि. म. चा वा. वि. म्हणजे टिळक महाविद्यालयाचा वाङ्मयविशारद. मीं वडिलांना साफ सांगितलें त्याच वेळीं कीं, मी टि. म. चा वा. वि. होण्या-ऐवजीं एस्. एम्. आर. चा टी. सी. होईन ! गेलीं दहा वर्षे कॉलेजमध्यें अशीं सुखाचीं गेलीं म्हणतां—मी रस्टिकेट झालों नसतों तर आणखी दोन वर्षे काढून मीं एक तप पुरें केलं असतं !

**दिलीप** : म्हणजे, तूं रस्टिकेट झालास कीं काय ? तें कां ?

**कल्याण** : तें कां ! आमचेच पराक्रम आम्हीं काय सांगावेत ! त्याचं असं झालं, कीं एका विद्यार्थिनीवर आमचं बसलं प्रेम ! तें कां बसलं, कसं बसलं हें नाहीं सांगत. अशी मस्त होती म्हणतां पोरगी ती ! पण भारी बेरकी ! तीन

वर्षं तिनं मला ताकास तूर लागूं दिला नाहीं. कारण काय तर तिच्यावर होता एका प्रोफेसराचा डोळा ! किती केलं तरी तो प्रोफेसर—आम्ही तर काय सगळ्या विषयाचे प्रोफेसरच ! तेव्हां त्या दोघांचं पटकन् सूत जमलं आणि आम्हीं बसलों कोकलत ! असं डोकं फिरून गेलं म्हणतां माझं ! नाहीं तर काय—तोंडांतला घास काढून नेला लेकानं माझ्या ! मग कां नाहीं डोकं फिरणार ? एके दिवशीं संध्याकाळीं टेकडीवर तिला घेऊन फिरायला गेला होता, तिथं त्याला गांठला आणि असा बेदम बडवला म्हणतां—अगदीं तिच्या देखत ! फिरून कॉलेजमध्यें गेलोंच नाहीं. रस्टिकेट केलं असं मित्र म्हणतात ! कोणास ठाऊक ?

**दिलीप** : म्हणून तूं आमच्या लोकपक्षाच्या स्वयंसेवक पथकांत सामील झालास होय ?

**कल्याण** : कॉलेजांतून निघालों, तेव्हां पुढें काय करावं तेंच कळेना ! उडाणटप्पूपणा करण्याचा एकही धंदा सांपडेना ! शेवटीं कांहीं दिवस भाई व्हायचं ठरवलं. स्वतःची टोपी काढून दुसऱ्याला टोप्या घालायच्या आणि स्वतःच्या खिशांत कवडीचें भांडवल नाहीं म्हणून भांडवलवाल्यांना भरमसाट शिव्या द्यायच्या एवढ्या भांडवलावर कोणीही भाई होतो ! शिवाय भाई झालं म्हणजे पोरीबिरींच्या ओळखीही होतात बऱ्यापैकीं, असं कोणीसं सांगितलं !

**दिलीप** : मग ? तें कां सोडलं !

**कल्याण** : अहो, कसलं काय अन् कसलं काय ! सारं खोटं ! ज्या भाई लोकांच्या वर्तुळांत मी शिरलों त्या ठिकाणीं इन्‌मिन् एकच पोरगी सभासद ! ती देखील अशी फडतूस ! आणि तसल्या त्या पोरीवरून भाईमंडळींत अशीं भांडणें लागून राहिलीं होतीं म्हणतां ! तेव्हां विचार केला कीं असल्या धकाधकीच्या मामल्यांत आपली कांहीं दाद लागायची नाहीं. आणि दिलें तें सोडून झालं ! पुढें निवडणुकी आल्या. तेव्हां त्या दंगलींत शिरलोंन् काय लोकपक्षांत ! आणि बनलों स्वयंसेवक ! मग काय 'इन्क्लिाब झिन्दाबाद ! इन्क्लिाब झिन्दाबाद !' असा गुरासारखा ओरडतो म्हणतां ! सारे रस्ते दणाणून टाकतों ! पण खरं सांगायचं म्हणजे या साऱ्या गोष्टीचा मला अगदीं वीट आला आहे. काय करावं हेंच कळत नाहीं !

**दिलीप** : हें पहा कल्याण, तुमच्यासारख्या उत्साही तरुणांनीं अशा तऱ्हेनें आपल्या सामर्थ्याचा इतक्या लवकर व्यय करावा हें कांहीं ठीक नाहीं. तुम्हांला खरोखरच कांहीं कार्य करावयाची इच्छा असेल तर मी तुम्हांला देतों एक कामगिरी. तुम्ही आमच्या हिंदुसंघटनाच्या चळवळींत सामील व्हा.

**कल्याण** : मी आणि हिंदुसंघटनाच्या चळवळींत येऊं म्हणतां ! काय थट्टा करतां काय माझी ! अहो, मी ब्राह्मण तर नाहींच नाहीं, पण हिंदु तरी आहे काय याची मला शंका आहे. मी नरकांत जाणार म्हणून आमचे वडील तर रोज छातीवर हात मारून सांगत असतात !

**दिलीप** : तें कां ?

**कल्याण** : हें पहा, मी जन्मानें ब्राह्मण आहें. पण कित्येक वर्षें संध्या केल्याचं मला आठवत नाहीं. गळ्यांत जानव्याचा दोराही नाहीं, कीं डोक्याला शेंडीचा एक केस नाहीं. वडील जिवंत असतांना मी मिशा साफ खतम् करतों. अर्थात् याचा वडलांच्या प्रकृतीवर कांहीं परिणाम होत नाहीं ही गोष्ट निराळी. कोठल्याही देवळांत मी कधीं जात नाहीं कीं कोणत्याही देवापुढें मी टाळकं कधीं वांकवीत नाहीं. कोणताही धर्मग्रंथ कधीं वाचला नाहीं. गीता नांवाची एक मुलगी मला माहीत आहे; पण गीता नांवाचा ग्रंथ मीं पाहिला सुद्धां नाहीं. इराण्याच्या दुकानांत जाऊन मी चहा पितों, काय वाटेल तें खातों, आणखीही अनेक भानगडी करतों. मग आतां तुम्हीच सांगा कीं औषधापुरतं तरी माझ्यांत हिंदुत्व आहे का !

**दिलीप** : अगदींच मूर्ख आहेस. तूं काय वाटेल तें केलंस म्हणून तुझं हिंदुत्व कसं नाहींसं होईल ! तुझ्यासारखे शेंकडो हिंदु तरुण आहेत आपल्या समाजांत ! त्यांनाही असंच वाटतं ! मी सांगतों तुला, तूं नुसता हिंदु नाहींस तर पक्का हिंदु आहेस—

**कल्याण** : म्हणजे मी संध्या करीत नाहीं तरी हिंदु ?

**दिलीप** : होय, तरी हिंदु !

**कल्याण** : देवळांत जात नाहीं तरी मी हिंदु ?

**दिलीप** : होय, तरी हिंदु !

**कल्याण** : महाराबरोबर जेवलों तरी हिंदु ?

**दिलीप** : महारणीबरोबर लग्न केलंस तरी तूं हिंदु !

**कल्याण** : इराण्याच्या दुकानांत जाऊन काय वाटेल तें खातों तरी हिंदु !

**दिलीप** : होय–होय–होय, तरी तूं हिंदुच ! इराण्याच्या दुकानांतल्या जिनसाच काय पण सबंधचा सबंध इराणी जरी तूं घशांत घातलास तरी तूं हिंदुच ! तुझ्या पोटांत काय जातं यावर धर्म नसून तुझ्या हृदयांत काय आहे यावर धर्म अवलंबून आहे.

**कल्याण** : काय म्हणतां ! अजब शोध लावलांत तुम्हीं आज ! जीते रहा मेरा हिंदुधर्म ! मला वाटत होतं कीं माझ्या धर्माचा कधींच निकाल लागला.

**दिलीप** : छट्, ! धर्म कधीं बाटत नाहीं कीं बुडत नाहीं. धर्म हा चिरंतन आणि अमर आहे. तुझ्या वडिलांपेक्षां तूं शतपटीनें शुद्ध हिंदु आहेस !

हा आर्यधर्म माझा,
  अमर जगीं पसरितो तेजा !
मलिन जरी भासला चंद्रमा,
  दिपवी जगास मार्तंड हा !
बुडवि नभीं तारकापुंजा !

**कल्याण** : म्हणजे काय, म्हणतां काय ?

**दिलीप** : तुझ्या वडिलांचें धर्मप्रेम ब्राह्मण्याच्या आकुंचित अभिमानानें पांगळं झालं आहे, तर जातिबंधनें तोडण्याच्या तुझ्या नैसर्गिक वृत्तीमुळें समानतेच्या व स्वातंत्र्याच्या पायावर उभारलेल्या खऱ्या व्यापक धर्माचा तूं आजपर्यंत पुरस्कार करीत आला आहेस.

**कल्याण** : आज तुम्हीं नवीन प्रकाश मला दाखवलांत ! यापुढें तुम्हीच माझे गुरु आणि तुम्हीच माझे शंकराचार्य ! असा हिंदुधर्माचा अभिमान संचारला आहे म्हणतां माझ्या अंगांत या वेळीं ! आमचे वडील भेटायला पाहिजेत या वेळीं. खुर्दाच करून टाकतों त्यांचा ! सांगा काय करूं तें !

**दिलीप** : चल माझ्याबरोबर, म्हणजे सांगतों !

[ जातात.

# [ २ ]

त्रिभुवनचें घर. त्रिभुवनची धाकटी बहीण जयंती ही भिंतीवर लावलेल्या एका शंकराच्या तसबिरीला हार घालीत आहे व तोंडानें एक गाणें गुणगुणत आहे.

आधार पतितास तूं चंद्रमौळी !
मनिं या तुझा ध्यास !
असती महा देव,
मग कां न ये कींव ?
गिरिजाधवा, धांव,
आतां सहाय्यास !

[ इतक्यांत त्रिभुवन रागारागानें आंत येतो.

**त्रिभुवन** : दरवाजांत पाऊल टाकलं नाहीं तर शेणाची घाण !

**जयंती** : शेण कसलं – अंगणांत सडा घातला आहे !

**त्रिभुवन** : सडा, आपल्या अंगणांत सडा ! अंगणांत सडा घालायला आपण कांहीं हिंदु आहोंत काय ? अशी घाण सुटली आहे—

**जयंती** : पण दादा, तें गाईचें शेण आहे—गाईच्या शेणाला घाण येत नाहीं—

**त्रिभुवन** : माझ्यापुढें गाईच्या शेणाची तरफदारी करतेस ! एकाद्या भटानें तुला गाईच्या शेणाची लांच चारल्यासारखी दिसते आहे ! गाईच्या शेणाचीं हिंदु लोकांच्या सरावलेल्या नाकांना घाण येत नसेल, पण गाईचं शेणच काय पण गाईची कोणतीही गोष्ट माझ्या दृष्टीला पडली तर माझी तळपायाची आग मस्तकाला जातं ! त्यापेक्षां म्हशीच्या शेणाचा सडा शिंपडला असता तर मला कांहीं वाटलं नसतं–आणि काय ग, तुला हजार वेळां सांगितलं कीं तें तुळशीचं कळकट रोपटं अंगणांत लावायचं नाहीं. तरी फिरून तुझी कांहीं खोड जात नाहीं ! उपटून फेंकून द्यावं लागलं मला —

**जयंती** : दादा — दादा — माझी तुळस — ! किती दुष्ट आहेस तूं ! फेंकून दिलीस ?

**त्रिभुवन** : हिंदुधर्म सोडणार म्हणून बाहेर मी ठणाणा करून ओरडतों आहें आणि तुला इकडे हिंदुधर्माचा पान्हा फुटला आहे काय ? मी धर्मांतरवादी पक्षाचा एक प्रमुख पुढारी असतांना माझी बहीण हिंदुधर्माचा बडेजाव माजवते आहे हें जर आमच्या पक्षांतील लोकांना कळलं तर ते शेण घालतील माझ्या तोंडांत — तुझें तें गाईचें ! हिंदुधर्माचा आणि आपला कांहीं एक संबंध नाहीं ! हिंदूंच्या देवळांत जायचं नाहीं — हिंदूंचे ग्रंथ वाचायचे नाहींत — हिंदूंचे सण पाळायचे नाहींत — हिंदु देवांची आणि देवतांची पूजा करायची नाहीं — एवढंच काय पण, घरांत हिंदु देवतांची एक तसबीर देखील — ( एकदम भिंतीवरच्या तसबिरीकडे लक्ष्य गेल्यामुळें दचकतो ) — अं, हें काय, ही कसली तसबीर ? —

**जयंती** : शंकराची तसबीर आहे ती —

**त्रिभुवन** : शंकराची तसबीर ! आणि माझ्या घरांत ! त्या मसणवाटींतल्या दाढीवाल्या बं — भोलानाथाची तसबीर माझ्या घरांत ! आणि वर आणखी हारही घातला आहेस त्याच्या गळ्यांत ! अरे वा रे वा सोकाजी ! थांब —

[ तसबीर काढण्यासाठीं धांवतो.

**जयंती** : दादा — दादा — मी तुझ्या पायां पडतें. माझ्या शंकराची तसबीर — तुला पाप लागेल दादा —

**त्रिभुवन** : पाप ! ( हंसतो ) गेलीं पांच हजार वर्षें या मुरदाड देवाच्या धर्मांत कोल्ह्या कुत्र्याच्या किंमतीनें जगून काय पुण्य मिळवलं आपण, तर आतां त्यांना लाथाडल्यानें पाप लागायचं आहे मोठंसं ! पाप — पुण्य — शुभ — अशुभ — सोवळें — ओवळें हें सारं या नादान हिंदुलोकांच्या धर्मांत ! हा धर्म एकदां झुगारला कीं असल्या बाष्कळ कल्पनांची भुतावळ डोक्यांतून पार नाहींशी होईल ! चला शंकरभय्या, तुमची कैलासाला रवानगी करतों.

[ तसबीर खिडकीबाहेर फेंकून देतो.

**जयंती** : याचीं फळं भोगावीं लागतील केव्हां तरी —

**त्रिभुवन** : केव्हां तरी म्हणजे, हिंदूंच्या म्हणण्याप्रमाणें पुढल्या जन्मीं ना ! कोणास ठाऊक पुढल्या जन्मीं मी कोठें जातोंय् ! रौरवांत जातों कां पॅरडा-

इजमध्यें जातों, का कबरस्थानांत जातों ! झालं संपलं सारं ! हिंदुधर्माची एक खूण उरतां कामा नये आपल्या घरांत ! ( एका कोपऱ्यांतील बाळकृष्णाची मूर्ति पाहून ) अरेच्या, अजून हा लंगडा देव कोपऱ्यांत दबा धरून बसला आहेच का ?

[ तिकडे जाऊं लागतो.

**जयंती** : हं – दादा, खबरदार माझ्या बाळकृष्णाच्या मूर्तीला हात लावलास तर —

[ धांवत जाऊन हातांत घेते.

**त्रिभुवन** : नुसता हातच काय, त्याचा दुसरा पायच लंगडा करून टाकतों ! आण ती इकडे मूर्ति —

**जयंती** : प्राण गेला तरी मी तुला देणार नाहीं !

**त्रिभुवन** : कशी देत नाहींस तें पाहातों ! ! गझनीच्या महंमदाचं बळ या वेळीं माझ्या अंगांत संचारलं आहे. मार हांका तुझ्या त्या देवाला ! कसा तुझ्या मदतीला तो धांवून येतो आहे तें मी पहातों —

**जयंती** : माझ्या देहांतून प्राण आधीं जाईल आणि मग ही मूर्ति माझ्या हातांतून सुटेल !

**त्रिभुवन** : बेहेत्तर आहे मेलीस तर ! असली निमकहराम अवलाद पाहिजे आहे कोणाला या घरांत ! धर्मांतराच्या दिव्यांतून जातांना तुझ्यासारखे छप्पन्न बळी द्यायलाच पाहिजेत. ( तो तिच्या हातांतील मूर्ति ओढूं लागतो ) चल – सोड ती मूर्ति —

**जयंती** : देवा – देवा — गोपाळकृष्णा —

**त्रिभुवन** : खबरदार तोंडांतून त्या देवाचं नांव काढशील तर ! हिंदुधर्माचा सैतान तुझ्या अंगांत संचारला आहे कीं काय ? छे, अशानं नाहीं तूं वठणीवर यायचीस ! किती केलं तरी मी लष्करी माणूस आहें. ( एक चाबूक काढतो ) बोल आतां, कोठल्याही हिंदु देवाचं नांव मी तोंडावाटें काढणार नाहीं असं कबूल कर; नाहींतर तुझ्या पाठीच्या चिंधड्या लोंबवतों —

**जयंती** : माझ्या देहांतला कण न् कण हिंदूचा आहे ! माझ्या धमन्यांतून हिंदूचें रक्त उसळ्या मारीत आहे ! जोंपर्यंत या देहांत प्राण आहे तोंपर्यंतच

काय, पण मरतांना शेवटच्या क्षणाला देखील हिंदुधर्माचा आणि हिंदूंच्या देवाचा जयजयकार करीत मी मरेन !

**त्रिभुवन :** आपला आणि हिंदुधर्माचा कांहीं एक संबंध नाहीं ! बोल, तूं हिंदु नाहींस —

**जयंती :** नाहीं — मी हिंदु आहें —

**त्रिभुवन :** बेशरम, तुला अभिमान आहे कीं नाहीं आपल्या जातीचा ! हजारों वर्षे हिंदुधर्मानं आपल्याला लाथाडलें तरी स्वतःला हिंदु म्हणवतेस ! —

**जयंती :** वीस कोटी हिंदूंनींच काय पण साऱ्या जगानं जरी मला पायाखालीं तुडवलं तरी मी हिंदु म्हणूनच मरेन —

**त्रिभुवन :** ( मारतो ) बोल तूं हिंदु नाहींस —

**जयंती :** मी हिंदु आहें —

**त्रिभुवन :** ( मारतो ) अजून हिंदु !

**जयंती :** ( डोळे मिटून ) हो —

**त्रिभुवन :** अजून — ( मारतो ) अजून ! ( मारतो ) अजून —

**जयंती :** होय — मी हिंदु — हिंदु — हिंदु —

[ त्रिभुवन तिला आणखी मारूं लागतो, इतक्यांत माणिक येते.

**माणिक :** हं — हं — हें काय ! जीव कां घेतां तिचा !

**त्रिभुवन :** होय, जीवच घेतों आहें तिचा ! काय अवलाद आहे — हिंदुधर्म ! इतकं हिला मारलं — अगदीं हात दुखेपर्यंत मारलं तरी अजून म्हणते आहे कीं मी हिंदु —

**जयंती :** ( त्वेषानें ) हिंदु या दोन अक्षरांच्या नांवासाठीं आजपर्यंत हजारों लोकांनीं आपल्या प्राणांचे बळी दिले आहेत ! त्या हुतात्म्या हिंदूंच्या तेजस्वी परंपरेंत जन्माला आलेली मी वीरकन्या आहें —

**त्रिभुवन :** आणखी तोंड वर करून बोलतेस — जीभच उपटून काढतों तुझी —

[ तिच्या अंगावर धांवून जातो. माणिक त्याला अडवते.

**माणिक :** हं, शपथ आहे तुम्हांला माझी —

**जयंती :** प्राण गेला तरी आत्तां मी या घरांत पाऊल टाकणार नाहीं !

[ निघून जाते.

**त्रिभुवन** : थांब–थांब–जयंती–बाजूला हो तूं ! ती पळून चालली.

**माणिक** : पायां पडतें मी तुमच्या–कांहीं पळून जात नाहीं ती !

**त्रिभुवन** : तूं मला निष्कारण अडवलंस–नाहींतर आज मीं तिचा निकाल लावला असता—

**माणिक** : काय भयंकर आहांत तुम्ही ! मला तुमचं आतां खरंच भय वाटूं लागलं ! तुम्ही सख्खे भाऊ तिचे—

**त्रिभुवन** : मग असलों म्हणून – यापुढें हिंदुधर्मांत मागें खेचणारे हे नात्याचे पाश मीं तडातड तोडून टाकल्याशिवाय रहाणार नाहीं !

**माणिक** : माझ्या गळ्याची शपथ आहे – तुम्हीं फिरून असं केलंत तर—

**त्रिभुवन** : फिरून फिरून काय तुझ्या गळ्याची शपथ घालतेस – अजून कांहीं तुझ्या गळ्यांत क्रॉस अडकवला नाहीं मीं !

**माणिक** : म्हणजे ! लग्न झालें म्हणून क्रॉस घालीत नाहींत कांहीं आमच्या मध्यें ! आमच्यांत देखील मंगळसूत्र घालतों आम्ही !

**त्रिभुवन** : मंगळसूत्र ! अगदींच हिंदु ! खिस्ती झालांत तरी हिंदूंच्या या रानटी चालीरीति आहेतच का तुमच्यांत अजून ! मग चर्चमध्यें जाऊन मंगळागौर देखील पूजित असाल तुम्ही !

**माणिक** : पुरे झालं, कांहीं तरीच !

**त्रिभुवन** : मीं तुझ्याशीं लग्न केलं तर मंगळसूत्र बांधणार नाहीं अं तुझ्या गळ्यांत – साफ सांगतों !

**माणिक** : मग काय बांधणार !

**त्रिभुवन** : काय वाटेल तें बांधीन ! बुटाचा बंद बांधीन पण, मंगळसूत्र बांधणार नाहीं ! ए, ती बाटली अन् तो ग्लास आण इकडे ! छे, या पोरीनं आज माझं निम्मं रक्त खलास केलं —

**माणिक** : आली कां पिण्याची लहर ! अहोरात्र तुम्हांला पिण्यावांचून सुचतं आहे का दुसरं !

**त्रिभुवन** : हें बघ, ए, उगाच नको शिष्टपणाचा आव आणूंस ! तुमच्या लोकांत न पिणारा पुरुष औषधाला तरी सांपडेल का ? एखाद्याचे घरांत एखादे वेळीं बायबल सांपडायचं नाहीं – पण ब्रँडीची बाटली मात्र जरूर सांपडेल !

**माणिक** : सगळेच कांहीं असे नसतात !

**त्रिभुवन** : जाऊं दे झालं ! कशाला खोलांत शिरतेस ! आणि तशांत या नवीन हंगामी मंत्रिमंडळानं कालच दारुबंदीची एक योजना प्रसिद्ध केली आहे ! तीन वर्षांत म्हणे दारुबंदी करणार आहेत ! दारु पिऊन बडबडतात कीं काय लेकाचे कोणास ठाऊक ! तीन वर्षांत दारु बंद करण्याची हे योजना काढणार आहेत, तर तीन वर्षांत सारी दारु फस्त करण्याची मीही एक योजना काढतों.

[ पितो.

**माणिक** : माझ्याशीं लग्न झाल्यावर मी हें कांहीं एक चालू देणार नाहीं !

**त्रिभुवन** : असं कांहीं असेल तर लग्नापूर्वी आपली काडीमोड घे !

**माणिक** : म्हणजे !

**त्रिभुवन** : म्हणजे – म्हणजे काय ! हें बघ मी आपला आहें असा आहें ! आपल्याजवळ लपवाछपवी कांहीं नाहीं ! पत्करत असेल तर पहा ! नाहीं तर दुसऱ्या मार्गाला लाग —

**माणिक** : तर तर – कांहीं लाज वाटते आहे का कांहीं असं बोलायला ! इतकं सारं ठरून पुन्हां म्हणे लाग दुसऱ्या मार्गाला ! तें कांहीं नाहीं – आधीं मला सांगा – तुम्ही आमच्या धर्मांत केव्हां येणार आणि माझ्याशीं लग्न केव्हां करणार ?

**त्रिभुवन** : पण एवढी घाई कसली लागली आहे तुला ? धर्मांतराचीं कामं आहेत हीं ! दमादमानंच घ्यायला पाहिजेत !

**माणिक** : माझ्याकडून पैसे घ्यायला तुम्हांला मात्र घाई झाली होती अं ? एका वर्षांत तुम्हीं माझे सारे पैसे खलास केलेंत ! थोडेथोडके नाहीं पांचशें रुपये ओतले तुमच्या घशांत !

**त्रिभुवन** : पांचशें म्हणजे काय फार झाले वाटतं ! मीं मुसलमान होण्याचं कबूल केलं असतं तर हजारों रुपयांची रास पडली असती माझ्या पायावर ! म्हणे पांचशें रुपये दिले ! फिरून फिरून त्याचा एवढा उच्चार कशाला करायला पाहिजे ? आणि दिलेस म्हणजे कांहीं फुकट दिले नाहींस ! मी खिस्ती होऊन तुझ्याशीं लग्न करावं म्हणूनच तूं हा हुंडा दिला आहेस ना ?

**माणिक** : मग तुम्ही तरी एवढी चालढकल कां करतां ? रोजरोज पहावं तर आपलं लांबणीवर टाकतां ! आणि काल तर मीं कुठल्याशा वर्तमानपत्रांत वाचलं कीं, धर्मांतर करण्याचा तुम्हां लोकांचा हा नुसता डाव आहे. तेव्हांपासून तर माझ्या छातींत धडकी भरली आहे नुसती !

**त्रिभुवन** : हा त्या हिंदु पत्रांचा पाजीपणा असेल ! उद्यां आम्हीं धर्मांतर केलं म्हणजे बसेल त्यांच्या थोबाडांत—

**माणिक** : अहो, पण तुमचा हा उद्यां उगवणार केव्हां—

**त्रिभुवन** : उगवेल–उगवेल–धीर कां सोडतेस. धर्मांतर करणें हा कांहीं एकट्या दुकट्याचा प्रश्न नाहीं. तसें असतें तर तुझ्याशीं लग्न करून केव्हांच मोकळा झालों असतों मी. साऱ्या अस्पृश्यांनीं मिळून सामुदायिक रीत्या धर्मांतर करायचं अशी आमच्या पुढाऱ्यांची आम्हांला आज्ञा आहे.

**माणिक** : म्हणजे तोंपर्यंत मी वाट बघत बसूं कीं काय ? बस करा. तुमच्या पुढाऱ्याबिढाऱ्यांचं मला कांहीं सांगूं नका ! मला तुमच्याशीं लग्न करायचं आहे–पुढाऱ्याशीं नाहीं ! आणि काय हो, माझ्याकडून पांचशें रुपये घेतांना तुम्हीं आपल्या पुढाऱ्यांची परवानगी घेतली होती का ?

**त्रिभुवन** : काय बकवा लावला आहेस त्या पांचशें रुपयांचा ! तुझ्याकडून पांचशें रुपये घेतले म्हणजे कांहीं दुनिया लुटली नाहीं मीं !

**माणिक** : माझ्यासारख्या अनाथ ख्रिस्ती मुलीला पांचशें रुपये म्हणजे सर्वस्वच होय. तें सर्वस्व तुम्हीं लुबाडलंत. मी बोलूनचालून एका गरीब पालकाची मुलगी. बाप वारल्यावर आजूबाजूच्या मंडळींनीं होतं नव्हतं तेवढं लुबाडून नेलं. तेव्हांपासून स्वतःच्या पायावर उभें राहून शिक्षण घेतलं आणि नर्स झालें. तुम्हीं माझ्याशीं लग्न कराल या आशेनें आजपर्यंत जमविलेले सारे पैसे डोळे मिटून तुमच्या खिशांत ओतले—

**त्रिभुवन** : माझ्याशीं लग्न कर म्हणून मी कांहीं आपण होऊन तुझ्या पाठी-मागें लागलों नव्हतों. माझ्या त्या ऑपरेशनच्या वेळीं मी पंधरा दिवस इस्पि-तळांत जाऊन पडून होतों तेवढी तुझी आणि माझी ओळख. तर तेवढ्या वेळांत माझी शुश्रूषा करण्याऐवजीं प्रेमाच्या गोष्टी करून मला हैराण करून टाकलंस ! एक रोग घेऊन इस्पितळांत गेलों आणि दुसरा रोग घेऊन बाहेर आलों.

**माणिक :** किती खोटे आहांत ! केवळ माझी ओळख व्हावी म्हणून आजारी-पणाचं सोंग करून इस्पितळांत आलांत हें माहीत नाहीं वाटतं मला ? नाहीं तर काय झालं होतं हो तुम्हांला !

**त्रिभुवन :** तें राहूं दे. पण आतां खरं सांगूं तुला. पांचशें रुपयांत हें कांहीं सारं जमायचं नाहीं ! केव्हां तरी स्पष्ट सांगायलाच पाहिजे.

**माणिक :** म्हणजे काय, म्हणतां काय तुम्ही !

**त्रिभुवन :** पांचशें रुपयांत मी कायमचा ख्रिस्ती होऊं म्हणतेस ? काय वेड लागलंय का तुला ! दहा हजार वर्षें चालत आलेला एवढा मोठा हिंदुधर्म सोडावयाचा आणि केवढ्यासाठीं, तर म्हणे पांचशें रुपयांसाठीं ! अग, एकेका वर्षाला आठ आणे म्हटले तरी पांच हजार रुपये होतात ! पांच हजार राहूं दे, पण कांहीं हजार दोन हजार तरी ! धर्मांतर करायचं म्हणजे कांहीं लिलांव करायचा नाहीं धर्माचा पांचशें रुपयांसाठीं !

**माणिक :** काय हो, तुम्हांला काळीज तरी आहे का !

**त्रिभुवन :** होतं—पण तें तूं चोरून नेलेस ना मागें—

**माणिक :** पैशासाठीं का धर्म बदलणार आहांत तुम्हीं ?

**त्रिभुवन :** मग तुला काय वाटलं कीं मी तुझ्यासाठीं धर्म बदलणार आहें ? ऐहिक अभ्युदयासाठीं धर्माची जरूर असते, माहीत आहे ? हिंदु धर्मात राहून तर चार चव्वल मिळायची आशा नाहीं. म्हणून पहायचं दुसऱ्या धर्मात शिरून कांहीं घबाड मिळतं का नाहीं तें !

**माणिक :** म्हणजे मग आणखी पैसे तुमच्या घशांत घातल्याशिवाय तुम्ही माझ्याशीं लग्न करणार नाहीं तर ?

**त्रिभुवन :** पण तसं पाहिलं तर काय ग, लग्न करण्याची कांहीं आवश्यकता आहे का आपल्याला ?

**माणिक :** बस करा तुमचा बेशरमपणा ! बायबलवर हात ठेवून तुम्हीं मला लग्नाचं वचन दिलं आहे—

**त्रिभुवन :** बायबलवर, गीतेवर तर नाहीं ना ! हिंदुमाणसानं बायबलावर हात ठेवून वचन द्यायचं म्हणजे हलवायाच्या घरावर तुळशीपत्र !

**माणिक :** तुम्हीं माझा असा विश्वासघात केला तर प्राण देईन तुमच्या दाराशीं—

**त्रिभुवन** : प्राण देण्याच्या धमक्याशिवाय सुचतंय काय तुम्हां बायकांना ! प्राण दे नाहीं तर वाटेल तें कर—नाहीं तर तुझ्या त्या आकाशांतल्या बापाच्या नांवानं हंबरडा फोड—चल चालती हो—

**माणिक** : होत नाहीं—काय कराल तुम्ही—जीव घ्याल ? घ्या—

**त्रिभुवन** : मी लष्करी माणूस आहे ! दुसऱ्यांचा जीव घेण्याचा मला सराव आहे ! तुला काय खोटं वाटतं काय ?

[ तिच्या अंगावर धांवून जातो.

**माणिक** : ( ओरडत ) त्रिभुवन—

**त्रिभुवन** : मला धमक्या देतेस ?

[ तिला मारायला लागतो, तोंच सदानंद येतो.

**सदानंद** : ए, अरे काय हें, तिला मारायला ती अजून कांहीं लग्नाची बायको झाली नाहीं तुझी !

**माणिक** : वेळेवर आलांत तुम्ही. बरं का बॅरिस्टरसाहेब, हे नेहमीं असे क्षुल्लक गोष्टीवरून मारामारीवर येतात. मला मारायचीच जर यांना खुमखुम असेल तर माझ्याशीं लग्न करून खुशाल मारा कीं मला—

**सदानंद** : पण मी म्हणतों, झालं काय एवढं हातघाईवर यायला ?

**त्रिभुवन** : तर—तर—लग्न करतोंय् तुझ्याशीं ! पांचशें रुपयांत म्हणे धर्म सोडा ! उद्यां तूं मला आणखी पांचशें रुपये देशील आणि दारू सोडायला सांगशील ! अग वा ग वा !

**सदानंद** : तें मी सांगतों, तूं धर्म सोडशील पण दारू सोडणें शक्य नाहींस !

**माणिक** : तुम्हीच सांगा बॅरिस्टरसाहेब. धर्मांतर करून माझ्याशीं लग्न करण्याचं यांनीं मला वचन दिलं म्हणून माझ्याजवळचे होते नव्हते तेवढे पैसे मीं यांना दिले. आणि आतां हे साफ सांगतात कीं मी तुझ्याशीं लग्न करणार नाहीं. माझ्यासारख्या गरीब मुलीचा असा विश्वासघात करणं शोभतं का यांना ?

**सदानंद** : काय रे ए, हा काय फाजिलपणा चालवला आहेस ? नसलं तुला हिच्याशीं लग्न करायचं तर परत देऊन टाक तिचे पैसे !

**माणिक** : मला पैसे काय करायचेत ? मला लग्न करायचंय त्यांच्याशीं—

**त्रिभुवन** : परत करून टाकायला आहेत कोणाजवळ इथं पैसे ! पांचशें रुपयांत म्हणे धर्मांतरही करा आणि लग्नही करा ! इतक्या स्वस्तांत मिळतो होय नवरा हल्लींच्या काळांत ?

**सदानंद** : ही भाषा शोभत नाहीं अं तुला त्रिभुवन. माणिकबाई, तुम्ही जा आतां. ही वेळ नाहीं ठीक. ( तो फार प्याला आहे अशी खूण करतो ) मी करतों सगळी व्यवस्था. तुम्ही निर्धास्त असा. अगदीं सगळं तुमच्या मनाप्रमाणें होईल. मात्र मला एकदां भेटा—

**माणिक** : पहा बरं, बॅरिस्टरसाहेब, आतां मीं सर्वस्वीं तुमच्यावर अवलंबून आहें. मला कांहीं यांचा विश्वास वाटत नाहीं. पण तुम्ही म्हणतांय म्हणून—

[ जाते.

**सदानंद** : तुझ्या धर्मांतराच्या भानगडींत तूं या पोरीचा कशाला गळा कापतोस ?

**त्रिभुवन** : मी कशाला कापतों आहे ? तीच आपला गळा कापून घेते आहे. आणखी पैसे घेऊन ये म्हणावं म्हणजे करतों गळा शाबूत ! पैसा पाहिजे बाबा, आज पैसा. तुला असं वाटतं का स्वर्गांत पहिल्या ओळींत जागा मिळविण्याच्या महत्त्वाकांक्षेनें आम्ही धर्मांतर करतों आहोंत ? सगळे धर्म सारखेच. नुसता केसांचा फरक. शीख व्हायचं म्हणजे साऱ्या डोक्यावर आणि तोंडावर दाढीमिशांचं जंगल राखायचं. ख्रिस्ती व्हायचं म्हणजे डोक्यावर केस राखायचे आणि तोंड सफा करायचं. आणि मुसलमान व्हायचं म्हणजे डोकं सफा करून तोंडावर केसांचा झुबका वाढवायचा. दुसरं कायं ? जिथं पैसा मिळेल तिथं जायचं एवढं मला ठाऊक आहे !

**सदानंद** : मला पहिल्यापासून थोडा संशय होताच. पण तुझ्या आरडाओरडीमुळें मला कित्येक वेळां वाटे कीं खरोखरच तत्त्वासाठीं तुमचा झगडा आहे.

**त्रिभुवन** : आपलं तत्त्व एक, आणि तें म्हणजे पैसा ! अस्पृश्यांचा प्रतिनिधि म्हणून मी इतकीं वर्षें लोकलबोर्डांत आणि म्युनिसिपालिट्यांत कामें करतों आहे तीं काय लोकसेवेच्या तळमळीनं ? नाहीं. पैसा हें आपलें ध्येय ! माझे भावच मुळीं ठरलेले. अध्यक्षाची निवडणूक पांचशें रुपये. स्टँडिंग कमिटीची निवडणूक दोनशें. स्कूलबोर्ड शंभर ! आतां या धर्मांतराचे देखील माझे भाव मीं अगदीं ठरवून ठेवलेले आहेत. कायमचं ख्रिश्चन व्हायला दहा

हजार रुपये. कायमचं शीख व्हायला बारा हजार. आणि कायमचं मुसलमान व्हायला पंधरा हजार रुपये. आणि एकेक वर्षच कोणत्याही धर्मात जायचें तर सरसकट दोन हजार रुपये.

**सदानंद** : मुसलमान व्हायची तुझी तयारी आहे का ?

**त्रिभुवन** : किती वर्षें —

**सदानंद** : तें तुझं तूं पाहून घे. हें बघ, तूं जसा पैशांच्या अडचणींत आहेस तसा मीही आहें. या निवडणुकींत मला किती चट्टा बसला हें तुला ठाऊक आहे ? म्हणून तुझ्या या धर्मांतराच्या भानगडींत मलाही चार पैसे मिळाले – अर्थात् रास्त रीतीनें – तर ते मला हवेच आहेत. तूं जर मला निम्में कमिशन कबूल करशील तर एका माझ्या मुसलमान कुळाकडून तुला पांच हजार रुपये आंताचे आतां देववतों. म्हणजे दोघांना अडीच अडीच हजार रुपये पडतील. मग तूं एक वर्ष त्या धर्मात रहा – नाहींतर दोन वर्षें रहा –

**त्रिभुवन** : कबूल — एकदम कबूल ! दोस्त आहेस माझा तूं. एवढे पैसे कोण कोणाला मिळवून देतो ? टाळी दे —

**सदानंद** : ठरलं ना मग ! बाहेर मीं त्या गृहस्थांना उभें केलें आहे. हें पिण्याचं सामान चल बाजूला ठेवून दे. मुसलमान आहेत ते ! त्यांना हें खपायचं नाहीं !

**त्रिभुवन** : असं असेल तर आपल्याला ही भानगड नको ! कोणी वाटेल तितके पैसे दिले म्हणून हा धर्म ( पिण्याची क्रिया हातानें दाखवून ) नाहीं सुटायचा !

**सदानंद** : सध्यांपुरती थोडी कळ काढायची – मूर्खच आहेस – पुढें तूं काय वाटेल तें केलेंस म्हणून कोण विचारतो ?

[ सामान घाईघाईनें उचलून ठेवतो.

## [ ३ ]

सदानंद व कादरखान बोलत बोलत बाहेर येतात.

**सदानंद** : अस्पृश्यांचे फार मोठे पुढारी आहेत ते ! माहीत आहे ?

**कादरखान** : म्हणून तर यांच्या पाठीमागें मी होतों. नाहींतर कोण एवढे पैसे खर्च करतो आहे ?

**सदानंद** : शेंकडो अनुयायी आहेत यांच्या मागें ! हे एकदां तुमच्या कह्यांत आले म्हणजे बाकीचे हां हां म्हणतां येतील मागून !

**कादरखान** : धर्माचें काम आहे म्हणून आम्ही हें करतों इतकेंच. आणि त्यांतून धर्मांतर करण्याचें या लोकांनीं आधींच ठरविलें म्हणून आमच्या डोक्यांत ही कल्पना आली. बाकी असल्या भानगडींत मी पूर्वी कधींच पडलों नाहीं. तुम्ही होतां म्हणून इतक्या लौकर हें जुळलं. आतां पैसे गेले—

**सदानंद** : अहो, पैसे जायचेच. धर्माचीं कामं असलीं म्हणून तीं धर्मादाय का कोणी करतें ? बरं, तें राहूं द्या, आमच्या पैशाचं काय ?

**कादरख़ान** : तुम्ही पैसे पैसे काय घेऊन बसलांत बॅरिस्टरसाहेब ? तुम्ही सर साहेबांना सांगून आम्हांला आपलं ते ऑनररी मॅजिस्ट्रेट करून टाका एकदांचे—

**सदानंद** : हें पहा, खानसाहेब, गुरुनाथ प्रधान झाल्यापासून त्यांनीं मला आपला खाजगी सेक्रेटरी नेमलें आहे. तेव्हां सध्यां सारीं सूत्रं माझ्या हातांत आहेत असंच म्हणाना. ते आहेत मुख्य प्रधान, पण सारीं कामें करावीं लागतात मला. अहो, इथं डोकं खाजवायला मला वेळ नाहीं. रोज लोकांच्या अर्जांचे भारेचे भारे येतात. कोणी योजना पाठवितो आहे. कोणी सूचना धाडतो आहे. कोणी शिष्टमंडळें घेऊन येतो आहे. सतराशें छपन्न भानगडी. तुम्ही दमादमानें घ्या. ऑनररी मॅजिस्ट्रेटच काय घेऊन बसलां आहांत तुम्ही—तुम्हांला पुढल्या पदवीदानाच्या वेळीं खानबहादुर करून टाकतों.

**कादरखान** : अस्सं ? वा वा, बहोत अच्छा ! मग आम्हीही तुम्हांला सांगतों कीं फिरून कोर्टांत जायची पाळी तुम्हांला यायची नाहीं इतकी आम्ही तुमची व्यवस्था करून ठेवतों. बरं, कोटेश्वराच्या देवळापुढची जी मोकळी जागा आहे ती आमच्या मालकीची आहे असा तुम्ही सांगितल्याप्रमाणें अर्ज मीं सरसाहेबांकडे पाठविला होता. त्यासाठीं आज चार वाजतां त्यांच्या-कडून भेटायचं बोलावणं आलं आहे.

**सदानंद** : असं काय करतां, मींच पाठविलं ना तें उत्तर ! त्या बाबतींत मी तुम्हांला मुद्दाम सांगणार होतोंच. ( हलक्या आवाजांत ) मात्र माझं या बाबतींत तुम्हांला सहाय्य आहे याचा आधीं एवढासा सुद्धां सुगावा सरसाहेबांना लागतां कामा नये—

**कादरखान** : मी खुदाची कसम खाऊन सांगतों—

**सदानंद** : नाहीं – मला तुमचा विश्वास आहे. म्हणूनच मी या भानगडींत पडलों. काय वाटेल तें झालें तरी तुम्हीं आपला आग्रह सोडतां कामा नये. भिऊं नका – जेवढा त्यांना दम द्यायचा असेल तेवढा द्या — मुसलमानांच्या नुसत्या दमानें आणि धमक्यांनीं हिंदु लोक घाबरून त्यांना काय वाटेल तें देऊन टाकतात असा आतांपर्यंतचा आणि आजचाही इतिहास आहे.

**कादरखान** : पण सरसाहेब रागावले म्हणजे माझें तें ऑनररी मॅजिस्ट्रेटचं फिसकटेल ना सारं--

**सदानंद** : त्याची तुम्ही फिकीर करूं नका. आंतून काय किल्ली पिरगाळून ठेवायची ती मी ठेवतों. अहो, त्यांना तरी प्रधानपद टिकवायचं म्हणजे तुमच्यासारख्यांच्या विरुद्ध जाऊन कसं भागतंय् ? आणि मुसलमानांच्या विरुद्ध तर त्यांना जातांच यायचं नाहीं ! या आंतल्या भानगडी मला विचारा ना ?

**कादरखान** : तुम्हीं सांगतां म्हणूनच मीं या बाबतींत जोर धरला आहे. मी जातों. आज जरा घाईत आहें. विड्यांच्या कारखान्यांत सत्यनारायण आहे आज--

**सदानंद** : म्हणजे तुम्ही सत्यनारायणही करतां काय ?—

**कादरखान** : मी कसला ? आमच्या नोकर लोकांची असते ही भानगड दरवर्षी. जातों मी. चार वाजतां भेटूंच. सलाम.

[ जातो. सदानंद स्वतःशींच खूष होऊन सिगारट पेटवतो. इतक्यांत सोमेश्वर येतो.

**सोमेश्वर** : बरें भेटलांत तुम्ही सदानंद. तुमच्याकडेच निघालों होतों. आमच्या कोटेश्वराच्या देवळासमोरच्या मोकळ्या जागेबद्दल ही काय भानगड काढली आहेत तुम्हीं ?

**सदानंद** : मी कशाला काढतों आहें – मुसलमान लोकांनीं म्हणजे ते आपले खानसाहेब कादरखान आहेत ना त्यांनीं अर्ज केला आहे ती जागा मिळण्याबद्दल--

**सोमेश्वर** : ते लोक लाख अर्ज करतील म्हणून काय झालं ! आज ही जागा मिळाली – उद्यां ती मिळाली, तर परवां ते गंगा नदी मिळावी

म्हणून देखील अर्ज करतील! असले अर्ज आले कीं त्यांना कचऱ्याची पेटी दाखवायची! तें सोडून शिष्टमंडळं कसलीं बोलावतां आहांत आणि चर्चा कसल्या करतां आहांत?

**सदानंद** : सरकारी काम आहे हें सोमेश्वर — तिथं अशी दांडगाई करून कसं चालेल? दुपारीं चार वाजतां तुम्हांला सरसाहेबांना भेटायला जायचं असेल — आज——

**सोमेश्वर** : म्हणून तर म्हणतोंय मी! आम्ही आपले आनंदांत होतों कीं आतां सर गुरुनाथ प्रधान झाले तेव्हां अगदीं आपलं राज्य सुरू झालं! पण हें काय भलतंच उपटलं? मी तुम्हांला सांगतों सदानंद. हें देऊळ माझ्या खासगी मालकीचं आहे, आणि ही जागा देखील माझ्या मालकीची आहे. मुसलमानांनीं ही जागा मिळण्याबद्दल पांचदहा वर्षांपूर्वीं जंग जंग पछाडलें — पण मीं त्यांना दाद दिली नाहीं.

**सदानंद** : त्यांना कुठली तरी एक पूर्वींची सनद सांपडली आहे म्हणतात——

**सोमेश्वर** : अशा सनदा सतराशें साठ तयार करून देईन मी! आमचं घराणं या कामांत फार वाकबगार आहे. आमचे चुलते या भानगडींत जन्मठेप काळे पाण्यावर जाऊन आलेले आहेत, माहीत आहे? सनदीच्या अन् कागदपत्रांच्या बाता सांगतांय कोणाला?

**सदानंद** : आतां खरं सांगूं तुम्हांला सोमेश्वर — कोणाला सांगूं नका. तुम्हांला म्हणून सांगतों. सरसाहेबांना आपलं आसन स्थिर ठेवायचं आहे — आणि म्हणून त्यांना मुसलमानांची मर्जी कांहींही करून राखणें भागच आहे — ही अंदरकी बात आहे खरी!

**सोमेश्वर** : मला हा संशय आलाच. पण लक्षांत ठेवा. माझ्याशीं गांठ आहे म्हणावं. सनातनी हिंदूंचा सिंह आहे हा! त्याच्या आयाळीच्या एका केसाला धक्का बसला तर ओरडून ओरडून आकाशपाताळ एक करील हा! सोडायचा नाहीं. आमच्या हातून ही जागा तर जाऊं द्या! अशीं एक नाहीं छपन्न मंत्रिमंडळं खाऊन टाकूं. धर्मापुढें आम्हांला तुमच्या मंत्रि-मंडळाची काय किंमत?

**सदानंद** : हें पहा, आंतून तुम्हांला काय सहाय्य करायचं तें मी करतों. मुसलमानांच्या ताब्यांत आपली जागा जावी याच्या मी अतिशय विरुद्ध आहें. तुमची जर या कामीं थोडेसे पैसे खर्च करण्याची तयारी असेल तर आपण हें तुमचं काम नक्की करून देऊं.

**सोमेश्वर** : असल्या आडमार्गानं आपल्याला जायची मुळींच इच्छा नाहीं. आपण जन्मांत कधीं कोणाला लांच दिली नाहीं कीं पैसे चारले नाहींत. शिरा, पुरी, बासुंदी, मोदक, मांडे असला प्रकार कांहीं कोणाला चारायचा असेल तर सांगा. आपली तयारी आहे. पण पैसे ! प्राण गेला तरी नाहीं. मग बेहेत्तर आहे जागाच काय पण देऊळही गेलं तरी !

**सदानंद** : पहा बुवा, विरुद्ध पक्षाची फार दांडगी तयारी आहे या बाबतींत — म्हणून म्हणतों. नुसत्या भोजनानं का कुठें कामं होतात सोमेश्वर ! वर दक्षिणाही द्यावी लागतेच कीं नाहीं ?

**सोमेश्वर** : हो, हें बरोबर बोललांत ! ( विचार करून ) मग आमच्या 'मुष्टिमोदक' पत्राचा जप्त झालेला जामीन परत देण्याची व्यवस्था कराल तर कांहीं तरी सोय करतां येईल !

**सदानंद** : वा, ही छान कल्पना सुचविलीत. मग ठरलं तर. जातों मी. सरसाहेबांची वामकुक्षी संपली असेल. कागदपत्रांचा भारा पडला असेल. छे छे – भारी काम !

[ जातो. मागाहून "सदानंद, अहो सदानंद" अशा हांका मारीत कल्याण येतो.

**कल्याण** : सदानंद — गेले वाटतें—

**सोमेश्वर** : गद्धया, तूं कुठं हिंडतो आहेस इकडे ?

**कल्याण** : ( दचकून ) अरे बाप रे !

**सोमेश्वर** : काय, आश्चर्य वाटलं काय बापाला बघून ?

**कल्याण** : आश्चर्य वाटायचं काय कारण ? बापाला बघून 'अरे बाप रे' म्हणूं नको तर काय 'अग आई ग' म्हणूं ?

**सोमेश्वर** : तुझी जीभ देखील तुझ्या कानाबरोबर लांब होत चाललेली दिसते. दोन दिवस पत्ता आहे का तुझा घरांत ? कुठं उंडारतो आहेस ? आणि हें रे काय हातांत—

**कल्याण :** झुणकाभाकर सहभोजनाचीं तिकिटें ! तींच खपवण्यासाठीं हिंडतों आहें ना मी ! घेतां का एक ?

**सोमेश्वर :** आग लाव तुझ्या त्या सहभोजनाला आणि तिकिटांना ! हें – हें विकण्यापेक्षां गोंवऱ्या विकत कां हिंडत नाहींस गांवांतून ?

**कल्याण :** मी गोंवऱ्या विकायला लागलों म्हणून तुम्हांला स्वस्त्यांत विकीन असं वाटतं काय ?

**सोमेश्वर :** मला काय करायच्यात् गोवऱ्या—

**कल्याण :** लागतील – लागतील एक दिवशीं —

**सोमेश्वर :** बेशरम, माझ्या मरणावर टपला आहेस काय ? पण लक्षांत ठेव, तुझ्या आधीं कांहीं मी जात नाहीं. आटीव दुधावर व शिरापुरीवर वाढलेलें हें शरीर आहे. सकाळीं उठलों कीं पहिली दूध की लोटी आणि मग पुढचे उद्योग. गेलीं पन्नास वर्षें हा कार्यक्रम आहे. उगाच नाहीं. चहा ढोसून आणि झुणकाभाकर चिवडून जगतां येत नाहीं इतकं. खबरदार या भानगडींत पडलास तर ! इतके दिवस मी ओरडून ओरडून थकलों कीं कॉलेजमधलीं संमेलनं म्हणजे भ्रष्टाण्यां. त्या भ्रष्टाण्यांत जेवायची संवय झाल्यानं तुम्हां पोरांचा हा अधःपात झाला आहे. मराठ्यांबरोबर जेवतां जेवतां शेवटीं महारांच्या पंगतीला जेवण्यापर्यंत पाळी येऊन ठेपली तुमची. आतां भंगीच काय ते राहिलेत—

**कल्याण :** छेः छेः, गैरसमज आहे तुमचा ! आमच्या या सहभोजनांत महार, भंगी, धेड ढोर, चांभार – झाडून सारे लोक भाग घेणार आहेत ! भंगी तर उदक सोडणार आहेत !

**सोमेश्वर :** म्हणजे पाणीच पडलं न् काय साऱ्या धर्मावर ! हरामखोरा, ब्राह्मणाच्या पोटीं जन्माला आलास त्यापेक्षां एखाद्या भंग्याच्या पोटीं कां जन्माला आला नाहींस ?

**कल्याण :** आतां त्याला माझा काय इलाज आहे ?

**सोमेश्वर** चौऱ्यांशीं लक्ष योनी हिंडून देखील ब्राह्मणाचा जन्म प्राप्त होत नाहीं समजलास ? ब्राह्मण्य मिळविण्यासाठीं विश्वामित्रासारख्या तपोनिधींना हजारों वर्षें घोर तपश्चर्या करावी लागली ! तुम्हांला काय फुकटचं प्राप्त झालंय ना ब्राह्मण्य आमच्यामुळें ! म्हणून तें बुडविण्याची शरम वाटत नाहीं ! तूं या

सहभोजनांत भाग तर घे, एक ब्राह्मण तुला आपल्या घरीं जेवायला बोलावणार नाहीं—

**कल्याण** : ब्राह्मणाच्या घरीं जेवायला जातोय् कोण इथं लेकाचा ! आणि आम्हांला पाहिजे तें तिथं मिळणार आहे ?

**सोमेश्वर** : एक ब्राह्मण मुलगी देणार नाहीं तुला—

**कल्याण** : उत्तम ! ब्राह्मणाच्या मुलींना काय सोनं चिकटलं आहे ! आणि ब्राह्मणाच्या पोरी पाहिजेत कुणाला ! बावळट लेकाच्या ! आपल्याला काय, कोणत्याहि जातीची मुलगी चालेल—

**सोमेश्वर** : म्हणजे, उद्यां तूं एखाद्या महाराणीबरोबर लग्न करशील ?

**कल्याण** : करीन देखील, कुणी सांगावं ? कर्ता करविता तुमचा परमेश्वर आहेच ! आपण जिच्या प्रेमपाशांत पडणार तिच्याशीं लग्न करणार ! मग जात कोणतीहि असो—

**सोमेश्वर** : आतां मात्र तुझ्या बेशरमपणाचा कडेलोट झाला ! हें हें सारें वेड त्या इराण्याच्या हॉटेलांत जेवून, कॉलेजच्या भ्रष्टाण्यांत वाटेल त्याच्या शेजारीं बसून तुझ्या डोक्यांत शिरलें आहे. मी इतकीं वर्षे उगाच आरडतों आहें ! सहभोजन केलं कीं सहविवाह झालाच पाहिजे – आणि सहभोजन आणि सहविवाह एकदां का सर्रास सुरू झाला कीं सबगोलंकार म्हणजे निकाल हिंदुधर्माचा !

**कल्याण** : भ्रम आहे तुमचा ! हिंदुसमाजांतील साऱ्या जाती मेल्याशिवाय हिंदुधर्म जिवंत रहाणार नाहीं ! जाति मरणार तरच धर्म तरणार ! आणि हाडींमांसीं खिळून बसलेलें हें जातिभेदाचें जलाल विष मारून टाकण्याचा एकच रामबाण तोडगा म्हणजे झुणकाभाकर सहभोजन !

**सोमेश्वर** : खुद्द भगवंतानें निर्माण केलेली चातुर्वर्ण्यपद्धति तुम्ही धुंगरटी मोडणार ! तुमचे बाप उतरले पाहिजेत स्वर्गांतून !

**कल्याण** : आमचे अजून गेलेच नाहींत तर उतरणार कोठून !

**सोमेश्वर** : म्हणे जाती मरणार ! आणखी एक समसमानी जात मात्र वाढवणार तुम्ही ! पूर्वपुण्याईनं प्राप्त झालेलं ब्राह्मण्य बुडवून हजारों वर्षे पूर्वजांनीं जतन करून ठेवलेली आर्यसंस्कृति तोडून आणि परमेश्वरप्रणीत

श्रुतिस्मृतीवर आधारलेला सनातनधर्म बुडवून तुम्हांला काय नरकाचे वांटेकरी व्हायचंय् !

**कल्याण** : आमचं राहूं द्या हो — आम्ही काय नरकांत जाऊं नाहींतर ड्रेनेजमध्यें राहूं; तुम्ही तर स्वर्गांत जाल ना ! त्यांत आम्हांला आनंद आहे ! खुशाल स्वर्गांत जा — नाहीं अगदीं नंदनवनांत जा आणि पांच रुपये स्क्वेअर फुटानं जागा खरेदी करून प्लॉट्स् पाडून इमारती बांधून आरामांत रहा ! आमचं कांहीं म्हणणं नाहीं—

**सोमेश्वर** : तुम्हांला नरकाची भीति वाटेल कशी ! मेलेल्या जनावरांच्या मांसाचे तुकडे चघळणाऱ्या महारमांगांच्या घाणेरड्या घरांतून जाऊन बसणारे व जेवणारे तुम्ही ! तुम्हांला नरकाची भीति काय वाटणार !

**कल्याण** : तुमच्या स्वच्छतेची, शुद्धतेची आणि पावित्र्याची घमेंड बस करा ! महारमांग कालपरवां मेलेल्या जनावरांचें मांस खात असतील तर तुम्ही हजारों वर्षांपूर्वीं मेलेल्या रूढीचे मुडदे चघळीत बसलां आहांत अजून ! महारापोरांच्या अंगावर जेवढी घाण नसेल तेवढी कुचकट विचारांची घाण तुम्हां सनातनी लोकांच्या बुरसलेल्या टाळक्यांत आहे. आतां नुसत्या कपड्याविषयींच म्हणाल तर तुमची जानवीं, धाबळ्या अन् मुकटे जर खडकवासल्याच्या तलावांत बुचकळले तर साऱ्या पुण्याला पटकी झाल्याशिवाय रहाणार नाहीं !

**सोमेश्वर** : हिंदुधर्माला कोणी वाली नाहीं — म्हणून देवाब्राह्मणांची अन् गायाजानव्यांची बेशरमपणें थट्टा करायला तुम्हांला भय वाटत नाहीं ! मुसलमानांची थट्टा करा म्हणजे कळेल—

**कल्याण** : पण मुसलमानी धर्मासंबंधीं बोलायचं कारण काय आम्हांला ? आमचा धर्म आम्हांला सुधारायचाय ! म्हणून आम्ही आमच्या दोषावर प्रहार करतों.

**सोमेश्वर** : तुम्ही हिंदुधर्म सुधारणार ! तोंडं बघा तुमचीं ! तुम्ही बाडगे सुधारक हिंदुधर्माचे दुष्मन् आहांत. सहभोजनं अन् सहविवाह करून हिंदुधर्म धडधडीत बुडवतां आहांत तुम्ही ! आणि म्हणे सुधारणा करणार !

**कल्याण** : हें पहा तीर्थरूप, तुमचा हिंदुधर्म बुडत असेल — आमचा हिंदुधर्म कांहीं बुडत नाहीं ! सुतावर पाय पडला, कीं बुडाला तुमचा धर्म — सोडा प्याला कीं बुडाला तुमचा धर्म — पाव खाल्ला कीं बुडाला तुमचा धर्म — अरे, काय

धर्म आहे का चेष्टा आहे ! आज हजारों वर्षे तुमचा धर्म बुचकळ्या खातो आहे – आतां शिल्लक आहे कुठं ? आमचा हिंदुधर्म असला रड्या आणि बुड्या नाहीं ! आम्ही कांहीं केलं, कांहीं प्यालों, कांहीं खाल्लं तरी आमचा हिंदुधर्म वाटत नाहीं, बुडत नाहीं कीं विटाळत नाहीं ! तुम्ही कसले सनातनी ? आम्हीं खरे सनातनी आहोंत—

**सोमेश्वर :** हें – हें त्या हरामखोर दिलीपनं भरवलेलं दिसतं आहे तुझ्या टाळक्यांत—

**कल्याण :** मेल्यानंतर जास्तींत जास्त मोक्ष मिळवून देण्याची शक्ति चातुर्वर्ण्याच्या धर्मात असेल तर आमच्या डोळ्यांदेखत – आपल्या आयुष्यांत – आपल्या देशाला स्वातंत्र्य मिळवून देण्याचें सामर्थ्य आमच्या जातिनिष्ठ धर्मांत आहे ! उद्यां स्वराज्य मिळाल्यानंतर सुधारलेल्या राष्ट्राच्या मांडीला मांडी लावून राजकारण करायचंय् ! तिथं श्रावण्या करणाऱ्या आणि पंचगव्य पिणाऱ्या आणि सोंवळींओवळीं नेसणाऱ्या हिंदूंचें काय काम आहे ? साहेबाच्या तोडीस तोड पोषाख करणारा, कांट्यासुऱ्यानें टेबलावर जेवणारा, आणि मुसोलिनी – हिटलरच्या पाठीवर थाप मारून चिरूट फुंकणारा हिंदु आम्हांला निर्माण करायचाय् !

**सोमेश्वर :** सनातन धर्म बुडल्यानंतर असल्या स्वराज्याला आणि राजकारणाला काय जाळायचंय् ! तुझ्या धर्मभ्रष्टतेची मजल इतकी गेली असेल याची मला कल्पना नव्हती ! तोंड पहाणार नाहीं फिरून तुझं ! पाऊल टाकूं नकोस माझ्या घरांत ! मेलास तरी परवा नाहीं—

**कल्याण :** पण तुम्हांला पाणी पाजायला तरी कोणी पाहिजेना—

**सोमेश्वर :** तूं मला पाणी पाजणार ! त्या महारमांगांना पाणी पाज ! ते आहेत ना तुझे काकेमामे ! मला पाणी पाजतोय् ! माझ्या श्राद्धाला महार बोलावून झुणकाभाकर भोजन घालशील ! यापेक्षां निर्वंश झाला तरी बेहेत्तर !

[ रागारागानें जातो.

**कल्याण :** हिंदुधर्म की जय !

[ हंसतो; इतक्यांत जयंती येते.

**जयंती :** कां हो, काय, झालं काय तुम्हांला ?

**कल्याण :** हिंदुधर्माचं भयंकर प्रेम संचारलं आहे माझ्या अंगांत. ( बापा

टाकीत ) बरी आलीस तूं ! धर माझा हात आणि मला आवरून धर — नाहींतर एखादे वेळीं त्या म्हाताऱ्याच्या मागें जाऊन त्याचा गळा दाबीन !

**जयंती** : कोण म्हातारा ?

**कल्याण** : आमचे वडील ग ! मला धर्माच्या गोष्टी सांगताहेत ! असा बुर्जा उडवला त्यांचा म्हणतेस !

**जयंती** : पण येवढं भांडायचं कारण काय ?

**कल्याण** : कारण आजचं थोडंच आहे ! गेलीं पंधरा वर्षें आमच्या घरांत आम्हां दोघांमध्यें प्रचंड धर्मयुद्ध चाललें आहे. ते म्हणजे सनातन स्वराज्यसंघाचे पुढारी – आर्यधर्माचे आधारस्तंभ ! ब्राह्मण्याचा असा जाज्वल्य अभिमान भडकतो आहे त्यांच्या डोक्यांत कीं, नुसती बाहेरून आगकाडी त्यांच्या टाळक्याला लावली तर ती पेटेल ! आणि आमच्या ब्राह्मण्याबद्दल तर विचारायलाच नको – वयाच्या बाराव्या वर्षींच त्याचा निकाल लागला आहे !—

**जयंती** : बाराव्या वर्षी ? तो कसा काय ?

**कल्याण** : आमच्या घरांत म्हणजे स्नानसंध्या, पूजा, वैश्वदेव, नमस्कार, प्रदक्षिणा, व्रतें – वैकल्यें, एकादशण्या, श्रावण्या – श्राद्धं न् पक्ष – असल्या सतराशें छप्पन भानगडींचा वर्षाचे तीनशें पासष्ट दिवस नुसता बाजार भरलेला असायचा ! सोवळं – ओवळं, सुतक सोयीर – वृद्धि यांचा जुलूम तर कांहीं विचारूंच नकोस ! शेण, गोमूत्र आणि पंचगव्य आमच्या पांचवीला पुजलेलें ! याला हात लावायचा नाहीं – त्याला शिवायचं नाहीं; हें पारोसें – तें सोवळें; हें खरकटें – तें फराळाचें; हरे राम – राम – राम ! आयुष्य नको झालं होतं त्यावेळीं ! सुतावर पाय पडला – मार बुचकाळी ! फातड्याला हात लावला – मार बुचकाळी ! हजामत केली – ओत डोक्यावर पाणी ! साहेबाला शिवलों – धू हातपाय ! एकदां स्वयंपाकीणबाईला शिवायचं नव्हतं आमच्या, तिला चुकून कुठं धक्का लागला ! तर बादलीभर गोमूत्र माझ्या टाळक्यावर आईनें ओतून सचैल स्नान घातलं आणि वर वडलांनीं बेदम चोपून बेशुद्ध केलं तेव्हां आम्ही शुद्ध झालों. दर सहा महिन्यांनीं आमचा एक तरी नातेवाईक मरायचा आणि सुतक यायचं. त्या सुतकाच्या दहा दिवसांपेक्षां दहा वर्षें सक्त मजुरी पुरवली ! मुंज झाल्यानंतर तर या नरकयातना अशा बेसुमार वाढल्या म्हणतां ! देवपूजेचें काम आमच्याकडे आलें ! आमच्या देवघरांत दोनशेंसात

देव ! नर्मदेंतले गोटे, काळेकुळकुळीत शाळिग्राम, डाव्या उजव्या सोंडेचे गणपति, लंगडे बाळकृष्ण, बाण, टांक, लिंगं, गारगोट्या, दगड, माती, नि मसण ! या साऱ्या देवमंडळींना दुधादह्यांत आंघोळी घालायच्या आणि घासून पुसून चक्क करून गंधगोळया डकवायच्या आणि टाळक्यावर दुर्वा, फुलं, गवत, पाचोळा घालून जागच्या जागेवर बसवायचं ! आणि इतकंहि करून वर नैवेद्य दाखवायचा, घंटा बडवायची आणि शंख करायचा ! चार वर्षें ह्या हालअपेष्टा भोगल्या. शेवटीं एके दिवशीं इतका वीट आला, कीं सारे देव एका टोपलींत घातले आणि गांवाबाहेरच्या डोहांत नेऊन बुडवले आणि घरांतून पसार झालों रामदासासारखा, तो चार वर्षांनीं पुन्हां परत आलों !

**जयंती** : अस्सं ! आतां कळलं तुम्हांला ब्राह्मण्याचा कां वीट आला आहे तो ! पण ह्ल्लीं पहावं तर जो तो ब्राह्मण होण्याच्या मार्गाला लागला आहे !

**कल्याण** : पण ब्राह्मण्याचा हिसका कुठं कळला आहे त्यांना अजून ! जो तो जानवं अडकवतो नि ब्राह्मण होतो आहे ! गुरव लोक शैव ब्राह्मण झाले तर न्हावी लोक नापिक ब्राह्मण बनले — एवढंच काय पण महार आणि मांग देखील आपल्याला सोमवंशीय ब्राह्मण आणि मातंग गोत्रीय ब्राह्मण म्हणवूं लागले आहेत ! सारे नुसत्या जानव्यावरच खूष आहेत ! अजून या लोकांनीं पंचगव्य कुठं पाहिलंय ? तें पंचगव्य पळीभर यांच्या तोंडांत ओतायला पाहिजे म्हणजे सारे पांचजन्य करीत जानवीं फेंकून पसार होतील ! माझी आतां बालंबाल खात्री झाली आहे कीं, या ब्राह्मण्याच्या दांभिक स्तोमामुळें हिंदुधर्माचें वाटोळें झालें आहे. ब्राह्मण्याचें बंड मोडल्याशिवाय, जातीचें प्रस्थ तोडल्याशिवाय, हिंदुधर्मांतील जन्मजात विषमतेचें विष केव्हांही नाहींसें व्हायचें नाहीं.

**जयंती** : तुमची हिंदुधर्माविषयींची कल्पना इतकी उदार असेल असें मला वाटलें नाहीं. पण तुमच्यासारखे तोंडानें बोलणारे मीं पुष्कळ लोक पाहिले आहेत. हातून मात्र कांहीं व्हायचं नाहीं—

**कल्याण** : मी नाहीं हं ! मी 'बोले तैसा चाले' पैकीं प्राणी आहें. म्हणून तर या सहभोजनाच्या चळवळींत मीं पुढाकार घेतला आहे ! आमचे तीर्थरूप म्हणाले कीं, यापुढें कोणताही ब्राह्मण मला आपली मुलगी देणार नाहीं. मी म्हणालों, इथं कोण लेकाचा ब्राह्मणाच्या पोरीसाठीं अडून बसला आहे ? आपल्याला काय, कोई बी चीज चलती है !

**जयंती** : म्हणजे, तुम्ही वाटेल त्या जातींतल्या मुलीशीं लग्न करायला तयार आहांत ?

**कल्याण** : अगदीं ! अग एवढंच काय ? महारापासून मराठ्यापर्यंत झाडून साऱ्या जातींतल्या एकेका पोरीबरोबर आपली लग्न करायची तयारी आहे ! जाति मोडण्याची अशी वीरश्री चढली आहे म्हणतेस अंगांत !

**जयंती** : मला नाहीं खरं वाटत !

**कल्याण** : नाहीं खरं वाटत ? मग आतां कशी खात्री पटवूं ? ( एकदम ) तुझी कोणती जात आहे ?

**जयंती** : माझ्या जातीशीं तुम्हांला काय करायचंय् ?

**कल्याण** : नाहीं, म्हणजे खात्रीच पटवून देतों ! उगाच संशय नको मनांत !

**जयंती** : सांगूं तुम्हांला ? मी महार आहें !

**कल्याण** : तूं अन् महार ! ( मोठ्यानें हंसतो. ) तूं मला गाढव समजतेस कीं काय ? महाराच्या पोरी अशा फर्मास असतात होय !

**जयंती** : दिसण्यावरून का कोणाची जात ओळखतां येते ! तसं म्हटलं तर कैक ब्राह्मण महारासारखे दिसतात नि चांभार ब्राह्मणासारखे दिसतात ! नुसत्या दिसण्यावरच काय आहे ?

**कल्याण** : दिसण्यावर काय आहे ? अग, दिसण्यावरच फार आहे ! कांहीं कांहीं जातींतल्या पोरींना आपलं सौंदर्य लपवितां येणं अशक्य आहे. मी सांगतों तुझी जात. ( विचार करून ) तूं महार तर खास नाहींस ! कर कबूल—

**जयंती** : किती हुषार आहांत तुम्हीं ! कसं हो ओळखलंत ?

**कल्याण** : ( डोक्याला बोट लावून ) हें उपजत आलं आहे आमच्यांत !

**जयंती** : माझं राहूं द्या – पण तुम्ही महाराच्या मुलीबरोबर लग्न करायला तयार आहांत ना ? माझी एक मैत्रीण आहे – महार आहे.

**कल्याण** : तें जातिबितीचं सांगूं नकोस मला – ती दिसते कशी तें सांग—

**जयंती** : आहे माझ्यासारखीच आपली ! शिक्षणहि माझ्याइतकंच आहे !

**कल्याण** : मग कांहीं हरकत नाहीं !

**जयंती** : नाहीं ना ? मग द्या पाहूं वचन—

**कल्याण** : हें बघ, तुझी ती मैत्रीण मरूं दे ! तूं तिच्यासाठीं माझ्याकडे कशाला वशिला लावतेस ? ज्यानं त्यानं आपला स्वतःबद्दल विचार करावा. तुझ्याबद्दल काय बोलायचं असेल तें बोल—

**जयंती** : मला मुळीं लग्नच करायचं नाहीं !

**कल्याण** : काय हो हें असं ? लग्न करणार नाहीं तुम्ही, मग करणार काय ?

**जयंती** : अविवाहित राहून देशसेवा करणार आहें मी !

देश लावि छंद । जीवा,
प्रीतिचा न फंद !
आग लागली राष्ट्राला,
पेटल्या पहा या ज्वाला !
लग्नमंडपीं या काला
कोणती शिरेल बाला ?
देशकार्यकंकण हातीं !
घालुनी मुली किति फिरतीं !
बाशिंगें वाया जाती,
हाच काळ आज आला !

**कल्याण** : भलतंच कांहीं तरी ! अविवाहित राहून देशसेवाच काय पण कांहींच करतां येणार नाहीं ! आणि तसं पाहिलं तर कोणता देशसेवक अविवाहित आहे ? महात्मा गांधी घ्या, सरोजिनी नायडू घ्या, शौकतअली घ्या, जवाहरलाल घ्या – आतां त्याची बिचाऱ्याची बायको वारली तें निराळं ! एकूण एक सारे विवाहित आहेत. अहो, लग्न नाहीं केलंत तर देशसेवेकडे लक्ष लागणार कसं तुमचं ! छे छे छे, हें वेड डोक्यांतून काढून टाका तुम्हीं आधीं !

**जयंती** : पण मीं अजून लग्नाचा मुळीं विचारच केला नाहीं !

**कल्याण** : केला नसला तर करा ! अजून कांहीं तुमचा मोसम गेला नाहीं ! हल्लीं मी पहातों आहें: जी ती मुलगी म्हणते कीं मला मुळीं लग्नच करायचं नाहीं ! तुमच्यासारख्या सुंदर पोरींनीं लग्नं करायचीं नाहींत तर मग काय गांवांतल्या खत्रूड पोरींनीं लग्नं करायचीं ? म्हणजे निकालच लागला. एका पिढीच्या आंतच देशांत भयंकर प्रजेची पैदास व्हायची !

**जयंती** : तुम्ही लग्न करा आधीं – मग मी करीन मागाहून—

**कल्याण** : वा, वा, मी आधीं न् तुम्हीं मागाहून असं कशाला ! आपण बरोबरच लग्न करून टाकूं म्हणजे झालं ! हें पहा, या विषयावर मला तुमच्याशीं बोलायचंय् पुष्कळ ! त्या स्वयंसेवकपथकांत तुमच्याशीं बोलायला मला वेळच मिळाला नाहीं – आणि आतां खरं सांगूं, तुम्ही जर त्या पथकांत नसतां तर मी त्यांत कधींही सामील झालों नसतों ! इथं कोणाला त्या उडाणटप्पू आरडाओरडीची आवड आहे ? मग सांगा कधीं भेटणार तुम्हीं ?

**जयंती** : रहातां कुठं तुम्ही ?

**कल्याण** : ती आतां पंचाइतच आहे ! इतक्यांतच आमच्या वडिलांनीं आमची घरांतून हकालपट्टी केली आहे. तेव्हां राहतों कुठं म्हणून काय सांगावें ! नाहीं म्हणायला आमच्या सहभोजनासाठीं मंडप बांधलेला आहे मोठा ! तेव्हां सध्यां मुक्काम तिथेंच असं म्हणायला हरकत नाहीं. तुम्ही कुठं राहतां ?

**जयंती** : माझीही तुमच्यासारखीच स्थिति आहे आतां. कांहीं कारणांमुळें मलाही माझ्या घरांतून बाहेर पडावें लागलें. तेव्हां कुठं रहायचं हा माझ्यापुढं प्रश्नच आहे.

**कल्याण** : टाळी द्या. तुमच्या आमच्या पुष्कळच गोष्टी जमल्या म्हणायच्या ! मग बाकीचं जमायला कांहीं अडचण पडायची नाहीं. तुमची रहाण्याची सोय मी करतों. तात्पुरती नाहीं; अगदीं कायमची ! आतां सध्यां आपला मंडप आहेच. चार दिवसांनीं सहभोजन संपल्यावर मग शक्य असल्यास त्याच मंडपांत—

**जयंती** : पुरे वात्रटपणा हं ! तुम्हीं महाराच्या मुलीशीं लग्न करण्याचें कबूल केलं आहे.

**कल्याण** : मग तुलाच आपण घटकाभर महाराची मुलगी समजूं—

**जयंती** : घटकाभर काय जन्मभर समजलांत तरी माझी हरकत नाहीं !

**कल्याण** : तूं तरी काय कमी वात्रट आहेस! म्हणे तुला महाराची मुलगी समजा! ( हंसत ) चल, पुढचं पुढं पाहूं – सध्यां तर आपण या सहभोजनाच्या कामासाठीं हातांत हात घालून सहगमन करूं या!

[ जातात.

# [ ४ ]

सर गुरुनाथांचा दिवाणखाना. सदानंद घाईघाईनें येतो.

**सदानंद** : पट्टेवाला–( घंटा वाजवतो. पट्टेवाला येतो. ) साहेब उठले का?

**पट्टेवाला** : आतांच—

**सदानंद** : आणि अजून तूं फायली काढून ठेवल्या नाहींस! आतां शिष्टमंडळ येईल आणि मग वेळेवर एक कागद सांपडायचा नाहीं! सकाळपासून मी ओरडतों आहें. पूर्वींच्या प्रधानांचं राज्य नाहीं हें. आटप झटपट!

[ पट्टेवाला जातो. सदानंद एका टेबलावरचे कागद लावून ठेवतो, तोंच बाहेर जाण्याचा पोषाख करून अलका घाईघाईनें येते. त्याबरोबर सदानंद एकदम उठतो व तिच्याकडे क्षणभर निःस्तब्ध नेत्रानें पहात उभा राहतो.

**सदानंद** : ( रुद्ध स्वरांत ) अलका—

**अलका** : पहातां काय माझ्या चेहऱ्याकडे टवकारून? इंग्लंडमध्यें एखाद्या स्त्रीच्या चेहऱ्याकडे टक लावून पहाणें हा गुन्हा समजला जातो!

**सदानंद** : इंग्लंडमध्यें हा गुन्हा असेल. इथं नाहीं ना! आणि गुन्ह्याची माहिती तूं मला कशाला सांगायला पाहिजेस! असलं सौंदर्य पाहिल्यानंतर वाटेल तो गुन्हा करायला कोण तयार होणार नाहीं? कुठल्या मुलुखगिरीवर निघाली आहे स्वारी?

**अलका** : आज आमच्या महिलामंडळाचें टेनिस कोर्ट उघडण्याचा समारंभ आहे ना माझ्या हस्तें! बाबा मुख्य प्रधान झाल्यापासून हा उद्योग

लागला आहे माझ्या मागें ! रोज कांहीं ना कांहीं तरी बाहेर कार्यक्रम आहेच आपला ठेवलेला ! शिवाय आज सायंकाळीं 'गव्हमेंट हाऊस' वर जायचं आहे फिरून ! सार्वजानिक आयुष्य इतकं जिकिरीचं असतं याची कल्पना नव्हती मला !

**सदानंद** : आयुष्यांत एखादा भागीदार असला म्हणजे सार्वजानिक कार्यांचा हा भार तितकासा कष्टाचा वाटणार नाहीं—

**अलका** : झालं का सुरू फिरून तुमचं तें ! मला वाटलं विसरलां असाल—

**सदानंद** : सहज विसरून जाण्याइतकं का माझं प्रेम सामान्य आहे. निवडणुकीच्या आणि प्रेमाच्या बाबतींत निराश होणारा मी माणूस नाहीं ! मिळेल तेवढं पदरांत घ्यावं आणि पुढल्यासाठीं झगडत रहावं हेंच माझ्या प्रेमाचें धोरण आहे. केवळ तुझें दर्शन घडावें, तुझ्याशीं बोलायला मिळावें म्हणूनच ना मीं तुझ्या वडलांच्या हाताखालीं हें काम पत्करलें ? सवंग कीर्तीच्या मोहासाठीं तुझ्या प्रेमावर पाणी सोडायला तयार झालेला मी दिलीप नाहीं —

**अलका** : त्यांच्याबद्दल कशाला बोलतां ?

**सदानंद** : दिलीपच्या नांवाची मोहिनी अजून तुझ्या मनांतून उतरत नाहीं ! तुझ्या वडलांना प्राप्त झालेलं प्रधानपद, आजपर्यंतच्या जनसेवेच्या थोर तपश्चर्येचें त्यांना मिळालेलें हें फळ त्यांनीं लाथाडावें म्हणून जो तुझ्या प्रेमाचाही धिक्कार करण्यास सिद्ध झाला त्याच्याबद्दल अजूनही तुला तिरस्कार वाटला नाहीं ?

**अलका** : दिलीप भावनाशील आहेत. भावनेच्या क्षोभांत तोंडून निघालेले शब्द मनावर घेण्यांत काय अर्थ आहे ? आज ना उद्यां त्यांना त्याबद्दल पश्चात्ताप वाटल्याशिवाय रहाणार नाहीं.

**सदानंद** : हा निव्वळ तुझा भ्रम आहे ! दिलीपसारख्या निढोवलेल्या देशभक्तांना पश्चात्ताप कधीं होत नाहीं. आणि झालाच तर ते कधीं कबूल करायचे नाहींत. तुला संशयच वाटत असेल तर हा आणखी पुरावा पहा ! (खिशांतून एक हस्तपत्रक काढतो.) तुझ्या वडलांच्या मंत्रिमंडळाचा निषेध करण्यासाठीं दिलीपच्या अध्यक्षतेखालीं ही जाहीर सभा भरणार आहे आज !

**अलका** : नका मला तें दाखवूं!

**सदानंद** : सत्याकडे अशी डोळेझांक करण्यांत काय अर्थ आहे? तुझ्याऐवजी दुसरी एखादी मुलगी असती तर कधीं तोंड पाहिलं नसतं तिनं असल्या माणसाचं! मी म्हणतों तुझं एक वेळ माझ्यावर प्रेम नसेल! पण तुझ्या वडलांवर तर तुझं प्रेम आहे ना?

**अलका** : माझं मन अगदीं गोंधळून गेलं आहे. काय करावं तेंच कळत नाहीं! एक वेळ प्रिय वाटणाऱ्या व्यक्तीबद्दल निष्ठुरतेनें विचार करणें स्त्रियांना तरी निदान कठीण असतें.

सुखद गमली जी भावना,
भुलवी अजुनी ती या मना!
प्रियतम गमला नाथ पूजिला,
प्रेमभाव सुखकर पालविला,
प्रखर अनल तो कसा विझवूं बोला?

[ गडी येतो.

**गडी** : मोटार तयार आहे—

**अलका** : जातें मी. उशीरच झाला कीं—

[ घाईघाईनें निघून जाते. सदानंद तिच्याकडे पहात रहातो. इतक्यांत सर गुरुनाथ येतात. त्यांच्या हातांत कांहीं तरी कागद आहेत.

**गुरुनाथ** : असे महामूर्ख आहेत हे लोक! त्यांना वाटतं कीं मुख्य प्रधान म्हणजे राजाच लागून गेला आहे दुसरा! जो उठतो तो थेट माझ्याकडेच येऊन धडकतो! कमिशनर, कलेक्टर, मामलेदार कोणी अधिकारी अधींमधीं आहेत कीं नाहींत?

**सदानंद** : म्हणूनच मी आपल्याला सांगत होतों कीं हा पोष्टांतून येणारा कचरा निकालांत काढण्याची मला आपण परवानगी द्या!

**गुरुनाथ** : तीं सारीं पत्रें न् अर्ज वाचणें शक्यच नाहीं मला. वेड लागायची

पाळी यायची. काय वाटेल तें खरडतात हे! हें बघा, एका चार मुलींच्या बापाकडून हा अर्ज आला आहे. हुंड्याची रक्कम सरकारकडून कर्जाऊ मिळावी म्हणून यांनीं मागणी केली आहे. हा दुसरा अर्ज. कुठलं एक कार्टं एका शाळेंत नापास झालं आहे. त्याला वरच्या वर्गांत घालण्यासाठीं मीं त्या शाळेच्या हेडमास्तरला दम भरावा असें त्याच्या पालकांचं म्हणणं आहे! छान! हा तिसरा अर्ज. एका घरमालकाला शौचकूप बांधायला म्युनिसिपालिटी परवानगी देत नाहीं म्हणून त्यानें तक्रार केली आहे! असे बेवकूफ लोक आहेत एकाहून एक! आणि या लोकांना म्हणें स्वराज्य पाहिजे. (टेबलावरची एक मोठी फाइल पाहून) ही कसली फाईल?

**सदानंद** : या निरनिराळ्या लोकांकडून योजना आल्या आहेत आतांपर्यंत—

**गुरुनाथ** : या योजनांनीं तर अगदीं भंडावून सोडलं आहे! जो उठतो तों आपला योजना पाठवतो आहे मंत्रिमंडळाकडे! आम्हांला कांहीं अकला आहेत कीं नाहींत! प्रत्येकाला वाटतं कीं आपण मुख्य प्रधानाचे बापच आहोंत जसे कांहीं! (एक कागद उचलून) हे काय म्हणतात—ब्रह्मचाऱ्यावर व लग्न न करणाऱ्या विधुरावर कर बसवावा! कुणी तरी अडलेला मुलीचा बाप दिसतोय् हा! (दुसरा कागद घेऊन) हें काय? लोकांना उत्तम अन्न मिळावें म्हणून सरकारनें हॉटेलें व खानावळी उघडाव्यात! भले शाबास! (तिसरा कागद घेऊन) तीन वर्षेंपर्यंत रयतेकडून कोणत्याही प्रकारचा कर वसूल करण्यांत येऊं नये. म्हणजे सरकारनें काय शंख करावा? (चवथा कागद वाचतो) ‘दिवाणांनीं महिना पाऊणशें रुपये पगार घ्यावा. महिना चार हजार रुपये घेणें हें लोकांच्या पैशावर दरवडा घालण्यासारखें आहे.’ हरामखोर, पाऊणशें रुपये पगारावर काम करायला आम्ही काय हमाल आहोंत! सदानंद, उचला या योजना—होळी करून टाका त्यांची!

**सदानंद** : मीं पहिल्याप्रथमच आपल्याला सांगितलं—

**गुरुनाथ** : ज्याचा त्याचा आपला दिवाणांच्या पगारावर डोळा! कुणी म्हणतो महिना पाचशें रुपये पगार घ्या तर कुणी म्हणतो दीडशें घ्या! आणि हा दीडशहाणा तर पंचाहत्तरावर येऊन ठेपला आहे! लोकांना सांगायला काय होतं? हलवायाच्या घरावर तुळशीपत्र! दिवाणाला कांहीं पोरंबाळं, संसार आहे कीं नाहीं! दिवाणांचं दिवाळं निघून त्याच्या घरादाराचा लिलांव निघाला म्हणजे या लोकांच्या

डोळ्यांचं पारणं फिटेल ! चार हजार रुपयांपेक्षां एक पै देखील मी कमी घेणार नाहीं.

**सदानंद** : पण आपला निम्मा पगार सार्वजनिक कार्याला देणार असल्याचें आपण जाहीर केलें आहे !

**गुरुनाथ** : ह्या भुंकणाऱ्या कुत्र्यांचीं तोंडं बंद करण्यासाठीं तसं जाहीर करणं मला जरूरच होतं ! हा एक राजकारणांतला डाव आहे सदानंद. अहो, देतंय् कोण आणि घेतंय् कोण ?

[ पट्टेवाला कार्ड घेऊन येतो. सदानंद वाचतो.

**सदानंद** : कोटेश्वराच्या मंदिराच्या समोरील जागेबद्दल बोलावलेलें शिष्टमंडळ भेटण्यासाठीं आलेलें आहे.

**गुरुनाथ** : हें एक नसतं लचांड उत्पन्न झालं आहे ! या कांट्याचा नायटा झाला नाहीं म्हणजे मिळवली ! येऊं दे त्यांना—

[ पट्टेवाला जातो. थोड्या वेळांत कादरखान, एक मुसलमान व सोमेश्वर येतात. ते आल्यावर सर गुरुनाथांना अदबीनें नमस्कार करतात.

**गुरुनाथ** : बसा, काय भानगड काढली आहे तुम्हीं मंडळींनीं ही ! अधिकारसूत्रें हातीं घेऊन एक महिनाही आम्हांला झाला नाहीं तों अर्ज–तक्रारी–मुलाखती–शिष्टमंडळें–यांचा असा त्रास झाला आहे कांहीं विचारूं नका !

**सोमेश्वर** : राजकारभाराची सारी धुराच आपल्या खांद्यावर आहे ! तेव्हां एवढा त्रास व्हायचाच !

**कादरखान** : आपल्यावर साऱ्या लोकांचा विश्वास आहे. आपण आहांत म्हणून आपल्याकडे एवढ्या आशेनें आम्हीं येतों. या जागेच्या बाबतींत जर आपण न्याय कराल तर आमचा समाज तुम्हांला दुवा दिल्याशिवाय रहाणार नाहीं.

**सोमेश्वर** : तर तर–दुवा द्यायला काय होतंय् तुम्हांला फुकटचा ! आमचे शिव्याशाप बसतील ते ! सरसाहेब, मी तुम्हांला निक्षून सांगतों–कीं आम्हाला खिजवण्यासाठीं ही खाजवून खरूज काढली आहे मुद्दाम या लोकांनीं !

**कादरखान** : हें पहा साहेब, आतां यांच्यासारख्यांनीं अशी भाषा वापरल्यानंतर काय म्हणायचं !

**गुरुनाथ** : शांत व्हा सोमेश्वर, असा त्रागा करण्यांत काय हांशील आहे ?

**कादरखान** : तेंच तर आम्ही त्यांना सांगतों.

**गुरुनाथ** : हिंदुमुसलमानांनीं एकमेकांशीं प्रेमानें व सलोख्यानें वागायला पाहिजे ! त्यांतच आपल्या राष्ट्राचें कल्याण आहे !

**कादरखान** : लाख बोललांत ! अगदीं अक्षर न् अक्षर खरं आहे आपण म्हणालांत तें !

**सोमेश्वर** : राष्ट्राचें कल्याण गेलं चुलींत ! हा तत्त्वाचा प्रश्न आहे. हा आमच्या धर्माचा प्रश्न आहे ! स्वतःच्या गळयाला फांस लावून यांच्याशा सहकार्य करण्याची आम्हांला जरूरी नाहीं. काय हो खानसाहेब, तुमच्या इमानाला स्मरून सांगा—

**कादरखान** : तुम्ही साहेबांशीं बोला, माझ्याशीं नका बोलूं !

**गुरुनाथ** : तो नकाशा कुठं आहे सदानंद ? ( सदानंद जागेचा नकाशा त्यांच्यापुढें ठेवतो. ) हं आतां बोला, ही ती यांच्या कोटेश्वराच्या मंदिरापुढची जागा. खानसाहेब, तुमचं म्हणणं असं कीं ही जागा तुमच्या मालकीची आहे ?

**कादरखान** : होय, साहेब—

**सोमेश्वर** : वा – वा ! कांहीं वाटतं का बोलायला ! म्हणे, होय साहेब ! उचलली जीभ लावली टाळ्याला ! साहेब, ही जागा माझ्या मालकीची आहे. म्हणजे आमच्या देवळाच्या मालकीची आहे. वर्षानुवर्षें ही जागा आम्ही वहिवाटीत आहोंत. या जागेच्या मालकीचा मुळीं प्रश्नच उपस्थित होत नाहीं.

**कादरखान** : साहेब, ह्या जागेच्या या उत्तरेच्या बाजूला माझें घर आणि विड्यांचा कारखाना आहे ! इतकीं वर्षें आम्ही या जागेचा उपभोग घेत आहोंत. आमचं सारं गिऱ्हाईक या वाटेनंच दुकानांत येतं. या जागेवर माझा हक्क आहे. आणि शिवाय म्युनिसिपालिटीच्या अध्यक्षाच्या निवडणुकीच्या वेळीं आमच्या पक्षाचीं मतें आणून दिल्याबद्दल ही जागा मला मिळवून देण्याचें खुद्द अध्यक्षांनीं वचन दिलें आहे !

**सोमेश्वर** : तर तर – माझी जागा म्हणजे अध्यक्षाच्या बापाचाच माल ! वचन देतो आहे !

**सदानंद** : वास्तविक हा खाजगी तंटा आहे. तो कोर्टांत जाऊन तुम्ही

तोडून घ्यायला पाहिजे. मुख्य प्रधानांना असल्या बाबतींत तकलीफ देण्याचं कांहींच कारण नाहीं

**कादरखान :** हा खाजगी प्रश्न नाहीं ! हा सार्वजनिक प्रश्न आहे. ही जागा आम्हांला मिळाली नाहीं तर आमचा समाज खवळून जाईल व सार्वजनिक शांततेचा भंग झाल्याशिवाय रहाणार नाहीं !

**सोमेश्वर :** आणि ही जागा यांच्या ताब्यांत गेली तर सारा हिंदुसमाज खवळून गेल्याशिवाय रहाणार नाहीं हें पक्कें लक्ष्यांत ठेवा.

**कादरखान :** पुढल्या आठवड्यांत याच जागेवर आमच्या जमातीचें जेवण होईल त्यावेळीं तुमचे डोळे उघडील !

**सोमेश्वर :** पुढल्या आठवड्यांत कोटेश्वराचा उत्सव आहे. त्यावेळीं या जागेवर सहस्रभोजन होणार आहे तेव्हां तुमच्या डोळ्यांपुढें काजवे चमकतील !

**कादरखान :** औरंगजेब बादशहाच्या कारकीर्दींत ही जागा वंशपरंपरा आमच्या पूर्वजांना बक्षिस मिळालेली आहे !

**सोमेश्वर :** आमच्या पूर्वजांना शहाजहान बादशहानें ही जागा इनाम देऊन टाकली आहे.

**गुरुनाथ :** याला पुरावा काय ?

**कादरखान :** ही आमची सनद ! वाचा सोमेश्वर—

**सोमेश्वर :** मग तुम्हीच आमची सनद वाचा ही !

**कादरखान :** ही मोडींत आहे. ही काय वाचा ?

**सोमेश्वर :** ही फार्शींत आहे. ही तरी काय वाचा ?

**गुरुनाथ :** फारच भानगडीचें दिसतंय् हें प्रकरण !

**सोमेश्वर :** शंभर वर्षांपूर्वी या जागेवर ब्राह्मण लोक संध्या करीत असत.

**कादरखान :** चूक आहे. शंभर वर्षांपूर्वी फकीर लोक इथं नमाज पढत असत !

**सोमेश्वर :** आतां नक्कीच पुरावा देतों. या जागेवर आमच्या आजोबांची समाधि आहे.

**कादरखान :** ती तुमच्या आजोबांची समाधि नसून तें आमच्या पणजोबांचें थडगें आहे.

**सोमेश्वर :** आम्ही समाधि उकरून हाडं बाहेर काढूं आणि सिद्ध करूं कीं तीं आमच्या आजोबांचींच हाडं आहेत म्हणून !

**कादरखान :** तीं हाडं आमच्या पणजोबांचीं आहेत असं आम्ही देखील सिद्ध करूं !

**सोमेश्वर :** तुमचं काय तोंड आहे ? त्यांतलं हाड न् हाड हिंदूचें आहे असं आम्ही सिद्ध करूं. एवढंच काय पण तुम्ही सुद्धां हाडाचे हिंदु आहांत हें आम्ही सिद्ध करूं !

**कादरखान :** तोंपर्यंत तुमचीं हाडं रहातील का जागेवर शिल्लक ? साहेब, ही जागा आम्हांला जर मिळाली नाहीं तर तुमच्या मंत्रिमंडळाचे बारा वाजलेच म्हणून समजा.

**सोमेश्वर :** ही जागा आमच्या ताब्यांतून गेली तर तुमच्या मंडळाचे बाराच काय पण तीन तेरा वाजतील हें पक्कें ध्यानांत ठेवा.

**कादरखान :** आम्हीं मंत्रिमंडळाचा निषेध करूं.

**सोमेश्वर :** आम्ही मंत्रिमंडळाचा धिक्कार करूं.

**गुरुनाथ :** अहो, तुम्ही माझ्याकडे शिष्टाई करायला आलांत का शिव्या द्यायला आलांत ? मला माझ्या सहकारी मंत्र्यांचा या बाबतींत सल्ला घ्यायला पाहिजे. इतक्या तांतडीनें मला या प्रश्नाचा विचार करतां यायचा नाहीं !

**सोमेश्वर :** यायचा नाहीं म्हणजे काय ? आलाच पाहिजे. परवाच्या दिवसापासून उत्सव सुरू होणार आहे आमचा.

**कादरखान :** आमचाही उरुस त्याच दिवसापासून सुरू होणार आहे. अठ्ठेचाळीस तासांचे आंत या गोष्टीचा निकाल लागला पाहिजे. नाहीं तर दिवशीं मारामारी झाल्याशिवाय रहाणार नाहीं !

**सोमेश्वर :** मारामारी ? डोकीं फुटतील डोकीं ! आहांत कुठं ? एकदां आम्ही सनातनी लोक खवळलों म्हणजे कोणाच्या बापाला ऐकायचे नाहींत.

**कादरखान :** तुम्ही कोणाच्या बापाला ऐकणार नाहींत; पण आम्हीं खवळलों म्हणजे तर कोणाच्या बापाच्या बापालाही ऐकायचे नाहींत !

**गुरुनाथ :** भयंकरच पेंचप्रसंग निर्माण झाला आहे माझ्यापुढें ?

**सदानंद :** आपल्या मंत्रिमंडळावर आलेलें फारच मोठें गंडांतर आहे हें !

हो, आणि सांगायलाच विसरलों. परवा दिवशीं जें स्पृश्यास्पृश्यसहभोजन दिलीप आणि त्याचे सहकारी भरविणार आहेत तें सहभोजन संपल्यानंतर कोटेश्वराच्या मंदिरांत जाहीर रीत्या प्रवेश करणार आहेत—

**सोमेश्वर** : काय म्हणतां ? आमच्या मंदिरांत अस्पृश्य लोक प्रवेश करणार ?

**सदानंद** : या मंदिरप्रवेशसमितीचें शिष्टमंडळ आतांच बाहेर येऊन बसलें आहे. ( घंटा वाजवतो. ) यांचं काम झालंच आहे. ( पट्टेवाला येतो ) दे त्यांना पाठवून !

**गुरुनाथ** : तुम्ही सांगतां हें ऐकून तर मी हतबुद्धच झालों आहें ! ( सोमेश्वर व कादरखान उठूं लागतात ) तुम्ही जाऊं नका. देवळाबाबतचा प्रश्न आहे. म्हणून तुम्ही ह्या वेळीं इथं पाहिजेत.

[ दिलीप व कल्याण येतात.

**सोमेश्वर** : हें कार्टं आहेच यांत ! वेऱ्यासारखं पाठीमागं लागलं आहे माझ्या !

**दिलीप** : आपल्या हंगामी मंत्रिमंडळासंबंधीं मला मुळींच आदर नाहीं हें आपल्याला ठाऊक आहे.

**गुरुनाथ** : हें सांगण्यासाठीं येथपर्यंत येण्याची जरूरी नव्हती.

**दिलीप** : तथापि, ज्याअर्थी आपल्या हातांत सध्यां सत्ता आहे त्याअर्थी तिचा योग्य कार्याला उपयोग झाला तर तो आम्हांला हवा आहे.

**गुरुनाथ** : आपल्या सदिच्छेबद्दल मी आभारी आहें आपला.

**दिलीप** : अस्पृश्यता, निवारण हा सर्व राष्ट्रीय प्रश्नांत अत्यंत महत्त्वाचा प्रश्न आहे, हें मीं आपल्याला सांगायला पाहिजे असं नाहीं. विशेषतः सार्वजनिक देवळांत अस्पृश्यांना प्रवेश मिळवून देऊन त्यांच्या मूलभूत हक्काची घोषणा करणें हें आजच्या घटकेला अत्यंत आवश्यक आहे. आपल्या मंत्रिमंडळाची दोनतीन महिन्यांची ही शिराळशेटी कारकीर्द इतिहासांत नमूद व्हावी अशी जर आपली इच्छा असेल तर सार्वजनिक देवळें अस्पृश्यांना खुलीं करण्याचें हें महत्कार्य आपण साधावें हें सांगण्यासाठीं आम्हीं येथें आलों आहोंत.

**सोमेश्वर** : कोणत्याहि धर्मांत ढवळाढवळ करण्याचा सरकारला हक्क नाहीं—

**कल्याण** : तुम्ही मध्यें बोलूं नका. आम्ही यांच्याशीं बोलतों आहोंत.

**गुरुनाथ** : हें पहा, दिलीप, व्यक्तिशः माझीं सामाजिक मतें किती पुढारलेलीं आहेत हें तुम्हांला माहीत आहे. माझ्या घरांतील बहुतेक नोकरचाकर हे अस्पृश्यच आहेत. धार्मिक बाबतींत मी बुद्धिवादी असल्यानें अस्पृश्यांच्या मंदिर-प्रवेशाला मी तात्त्विकदृष्ट्या फारशी किंमत देत नाहीं ! तथापि सामाजिक हक्काच्या दृष्टीनें विचार करतां अस्पृश्यांच्या मंदिरप्रवेशाला माझा स्वतःचा पाठिंबा असूनही मी असें म्हणतों कीं या गोष्टीला कायद्यानें मान्यता देण्या-इतकी लोकांच्या मनाची तयारी आज झाली आहे असें मला वाटत नाहीं. म्हणून हा प्रश्न हातीं घेण्याची सध्यां तरी आमच्या मंत्रिमंडळाची तयारी नाहीं.

**दिलीप** : मग आपल्या मंत्रिमंडळाचें आयुष्य आणखी दोनच दिवस आहे असं मी आपल्याला बजावतों. परवांचे दिवशीं आम्ही अस्पृश्यांना घेऊन कोटेश्वराच्या मंदिरांत जाहीर रीतीनें प्रवेश करणार आहोंत—

**सोमेश्वर** : तें देऊळ माझ्या खाजगी मालकीचें आहे. मी देवळाचे दरवाजे बंद करीन !

**दिलीप** : लोकांनीं देवापुढें ठेवलेल्या तांदुळावर आणि पै पैशावर तुम्हीं आपलीं पोटं जाळतां आणि फिरून देऊळ आपल्या खाजगी मालकीचें आहे असं म्हणायला लाज कशी वाटत नाहीं तुम्हांला ? देवळाचे पुजारी म्हणे मालक ! देऊळ खाजगी आहे असं तुम्ही म्हणालांत तर आम्ही देवळावर सत्याग्रह करून तें ओस पाडूं ! तुमच्या खिशाला चट्टा बसला म्हणजे तुमचे डोळे उघडतील !

**सोमेश्वर** : प्राण गेला तरी शिरूं देणार नाहीं महारांना मी माझ्या देवळांत ! त्यापेक्षां माझें देऊळ मी यांना विकून टाकीन !

**कादरखान** : आपली विकत घ्यायची तयारी आहे. तुम्ही आमच्या ताब्यांत देऊळ देऊन तर पहा, म्हणजे दाखवतों हे लोक आंत कसे शिरतात ते !

**सोमेश्वर** : देऊळ माझ्या मालकीचं आहे. मी त्याला आग लावीन नाहीं तर काय वाटेल तें करीन !

**कल्याण** : देऊळ तुमच्या मालकीचं आहे ना ? मग मी तुमचा मुलगा आहें, टाका माझी वांटणी. तुम्ही नंदी घ्या, आम्हांला महादेव द्या.

**गुरुनाथ** : तुम्ही निष्कारण आततायीपणा करून सार्वजनिक शांततेचा भंग करणार असाल तर आम्हांला कायद्यानें तुम्हांला बंदी करावी लागेल.

**दिलीप** : दडपशाहीचे कायदे आम्ही पायाखालीं तुडवतों. जुलमी कायदे पुकारून तुम्ही राज्यकारभार चालवूं लागलांत म्हणजे त्याच दिवशीं तुमच्या मंत्रिमंडळाचं दिवाळं वाजलं म्हणून समजा. लोकांचा तुमच्यावर विश्वास नाहीं. तुम्ही जनतेचे खरे प्रतिनिधि नसून उपटसुंभ तोतये आहांत हें आपोआपच मग सिद्ध होईल !

**गुरुनाथ** : कायदेभंगाच्या धमक्यांनीं घाबरून जाणारा मी नाहीं ! निवडणुकींत लोकपक्षाला जय मिळाला म्हणून उन्माद चढला आहे काय तुम्हाला ? पण याद राखा, माझ्याशीं गांठ आहे. मंदिरप्रवेशाच्या नांवाखालीं आमच्या मंत्रिमंडळाला पेंचप्रसंगांत टाकण्याचा तुमचा डाव मी पक्का ओळखून आहें. तीस वर्षें राजकारणाच्या आखाड्यांत खेळलेला गडी आहें मी.

**दिलीप** : तुमच्या तीस वर्षांच्या राजकारणाची घमेंड पुरे ! तीस वर्षें कायदे-मंडळाच्या खुर्च्यांवर झोंपा काढून तुम्हीं काय केलंत ! नोकरशाहीच्या ताटा-खालचीं मांजरं होऊन आपला स्वार्थ मात्र भरपूर साधलात ! गोऱ्या अधिकाऱ्यांच्या खुषमष्कऱ्या करून भत्ते उपटलेत, पदव्या लाटल्यात, आणि इस्टेटी थाटल्यात !

**गुरुनाथ** : माझ्या तोंडावर माझी बदनामी ! यापुढें एक शब्द ऐकून घ्यायला मी तयार नाहीं. काय तुमचं सामर्थ्य असेल तें दिसूं द्या एकदां. त्याला तोंड द्यायला आम्ही खंबीर आहोंत.

**दिलीप** : आपल्या युद्धाच्या आव्हानाचा इथल्या इथेंच मी स्वीकार करतों. तुम्ही दडपेशाहीचे कायदे पुकारणार ? मग परवांचे दिवशीं कोटेश्वराचे मंदिरांत प्रवेश करणाऱ्या स्पृश्यास्पृश्यांना पाहूं तुमचे कायदे कसे अडवतात ते. लोकमताचा सागर एकदां खवळला म्हणजे कायद्याचे बंधारे किती टिकतात हें तरी तुम्हांला कळेल !

[ बाहेर मिरवणूक चालल्याचें एकदम ऐकूं येते. बँड व ब्युगलचा आवाज मोठमोठ्यानें ऐकूं येऊं लागतो.

**गुरुनाथ** : ( आश्चर्यचकित होऊन ) हें काय ?

**दिलीप** : हें काय ! याच त्या सागराच्या गर्जना ! ( बाहेरून जयघोष ऐकूं येतो. 'मंत्रिमंडळाचा धिक्कार ! लोकपक्षाचा जयजयकार' ) ऐका, ऐका हा

जयघोष ! मंत्रिमंडळाचा जाहीर निषेध करण्यासाठीं सभास्थानाकडे चाललेली ही काळ्या निशाणांची जंगी मिरवणूक आहे. बाहेर डोकावून पहा. म्हणजे हजारों काळीं निशाणें धांवून येतील !

**गुरुनाथ** : ( खवळून ) चला, चालते व्हा येथून !

**दिलीप** : मी कशाला थांबतोंय् ! मी तर या सभेचा अध्यक्षच आहें मुळीं !

**कल्याण** : इन्किलाब झिंदाबाद !

[ दिलीप व कल्याण जातात. बाहेरून संघगायनाचा आवाज—" नहि रखना, नहि रखना, मंत्रिमंडळ नहि रखना ! "

**गुरुनाथ** : बंद करा तीं दारें अन् खिडक्या ! माझा निषेध करताहेत हरामखोर ! मिरवणुकी बंद करीन ! सभाबंदीचा कायदा पुकारीन ! तुरुंगांत पाठवीन एकेकाला !

**सोमेश्वर** : सरसाहेब, फिरून आपल्याला बजावतों. आमच्या मंदिरावर जर अस्पृश्यांचा अत्याचार झाला तर तुमच्या मंत्रिमंडळाच्या निषेधाची याहिपेक्षां प्रचंड मिरवणूक काढूं आम्ही !

**कादरखान** : आणि आम्हांला ही देवळापुढची जागा मिळाली नाहीं तर साऱ्या दिवाणांच्या घरावर आम्ही काळीं निशाणें पसरूं !

**गुरुनाथ** : बाहेर व्हा आधीं ! बेवकूफ ! मला धमक्या देतां ! मी मुख्य: प्रधान आहें ! समजतां काय मला ! व्हा चालते इथून् – ( सोमेश्वर व कादरखान घाईघाईनें निघून जातात. ) सदानंद, आतांच्या आतां साऱ्या मंत्र्यांना टेलिफोन करून बोलवा. महत्त्वाची सभा आहे म्हणून सांगा.

[ बाहेरून अलका घाईघाईनें येते.

**अलका** : केवढी मोठी मिरवणूक ! इंग्लंडमध्यें देखील मी एवढी मिरवणूक पाहिली नाहीं ! आणि दिलीपच्या नांवाचा केवढा जयजयकार झाला आतां ! ऐकलांत – ऐकलांत बाबा तुम्ही !

**गुरुनाथ** : आग लाव त्या दिलीपला ! त्याच्या नांवाचा जयजयकार आणि माझ्या नांवाचा धिक्कार !

**अलका** : ओ, हाऊ वंडरफुल ! केवढं सामर्थ्य आहे दिलीपचं ! मी तर अगदीं थक्क झालें ! या – इकडे खिडकापाशीं या—

[ ती खिडकीकडे धांवते.

**गुरुनाथ** : खबरदार, त्या खिडकींतून बाहेर पाहिलंस तर—बंद कर ती! तुम्ही उभे काय राहिलांत सदानंद! एका बाजूला सनातनी हिंदु व मुसलमान यांचें भांडण व दुसऱ्या बाजूला अस्पृश्यांच्या मंदिर-प्रवेशाबद्दल लोकपक्षाचा सत्याग्रह. या बिकट पेंचप्रसंगांतून ताबडतोब मार्ग काढला नाहीं तर आमच्या मंत्रिमंडळाचा निकाल लागल्याखेरीज राहणार नाहीं!

**सदानंद** : आणि या पेंचप्रसंगांतून बाहेर पडण्याचा एखादा खात्रीचा मार्ग असला तर—

**गुरुनाथ** : आहे—यांतून बाहेर पडण्याचा मार्ग आहे? तो कोणता—

**सदानंद** : तो फक्त मलाच माहीत आहे! आपल्याला आणि आपल्या मंत्रिमंडळाला या संकटांतून मीच वांचवूं शकेन. मात्र (थांबून) त्याबद्दल मी मागेन तो मोबदला द्यायची आपली तयारी असली पाहिजे!

**गुरुनाथ** : मोबदला! या प्रसंगांतून सुटका होणार असेल तर काय वाटेल तो मोबदला देईन!

**सदानंद** : पहा—विचार करा—सांगूं? रागावणार नाहींत?

**गुरुनाथ** : (उतावीळ) बोल तूं—

**सदानंद** : मग (एकदम फिरून व अलकेकडे बोट दाखवून) हाच तो मोबदला!

**गुरुनाथ** : काय अलका?

[ सदानंद मान हलवतो. अलका एकदम मागें वळून पहाते. गुरुनाथ दोघांकडे आळीपाळीनें बघतो.

**पडदा.**

# ३

सर गुरुनाथांचा दिवाणखाना. सदानंद एका टेबलापाशीं कांहीं तरी लिहीत बसला आहे. इतक्यांत गडी एक भेटपत्र आणून देतो.

**सदानंद** : ( भेटपत्राकडे निष्काळजीपणें बघून ) सरसाहेब बाहेर गेले आहेत म्हणावं—

**गडी** : त्यांना आपल्याला भेटायचंय.

**सदानंद** : मी कामांत आहे, दिसत नाहीं का तुला ? मी बाहेर गेलों आहें म्हणून सांग.

[ गडी मुकाट्यानें निघून जातो. थोड्या वेळानें त्रिभुवन आंत येतो.

**त्रिभुवन** : वा दोस्त ! तुम्हीं तर अगदीं बड्या साहेबाचे बाप बनलांत कीं ! आंत बसून खुशाल सांगताय् कीं बाहेर गेलों आहें म्हणून. धडधडीत मी बाहेरून ऐकतों आहें.

**सदानंद** : तुम्ही होय ! मग सरळ कां नाहीं आलांत ! मीं पाहिलंच नाहीं तें कार्ड.

**त्रिभुवन** : आतां कशाला तुम्ही आमच्याकडे लक्ष द्याल ? तुम्ही आतां सर

साहेबांचे जांवई होणार ! सगळीं वर्तमानपत्रें भरून गेलीं आहेत तुमच्या अभिनंदनानें ! थोर लोक झालांत तुम्ही आतां. आम्हांला भेटायला वेळ कसा मिळणार तुम्हांला ?

**सदानंद** : तसं नाहीं. तुम्हांला आमच्या कामाची कल्पना नाहीं. आतां काल रात्रीचं बघा. दोन वाजेपर्यंत मंत्रिमंडळाची सभा चालली होती. आज मंदिरप्रवेशाच्या बाबतींत सभाबंदीचा व मिरवणूकबंदींचा जो सरकारी हुकूम निघाला आहे त्यावर मंत्रिमंडळांत भयंकर मतभेद निर्माण झाला आहे. खाजगी बातमी आहे. सांगूं नका कोणाला. ( हलक्या आवाजांत ) अगदीं राजिनामे देण्यापर्यंत पाळी येऊन ठेपली आहे.

**त्रिवभुन** : काय म्हणतां ? आणि मग—

**सदानंद** : मग काय ? काय होईल तें सांगतां येत नाहीं. राजकारण हें असंच असायचं ! तीन महिने मंत्रिमंडळ टिकलं याचं वास्तविक सारं श्रेय मला आहे. तुम्ही तें जाणतां. काय खटपटी न् काय लटपटी कराव्या लागतात मला !

**त्रिभुवन** : हें राहूं द्या ! आमचे पैसे केव्हां आम्हांला देणार ? तो कादरखान तर हात धुऊन माझ्या पाठीमागें लागला आहे ! अन्न खाऊं देत नाहीं मला !

**सदानंद** : मग अडचण कुठें आली ? करून टाका धर्मांतर ! म्हणजे त्या क्षणीं तुमचे सारे पैसे चुकते करून टाकतों.

**त्रिभुवन** : म्हणजे हा जुलुम आहे. धर्म बदलणार मी ! त्यांतली निम्मी दलाली तुम्ही खाणार. आणि ठरलेली माझी हक्काची रक्कम देखील तुम्हीच दडपून बसणार काय ?

**सदानंद** : तुमच्या धर्मांतराची जबाबदारी माझ्यावर आहे हें तुम्ही विसरलांत. उद्यां तुम्ही धर्मांतर न करतां पैसे घेऊन पसार झालांत तर तो कादरखान माझा गळा पकडील, माहीत आहे ? तुम्ही धर्मांतर करा आणि खुशाल पैसे घेऊन जा. मी कुठं नाहीं म्हणतों आहें ?

**त्रिभुवन** : म्हणजे, एकूण तुमचा माझ्यावर विश्वास नाहीं ?

**सदानंद** : तुम्हां धर्मांतरवाद्यांचा कोणीं विश्वास धरावा ? आणि पैशाच्या कामांत तर आपण यापुढें कोणाचाच विश्वास धरायला तयार नाहीं !

**त्रिभुवन** : हें पहा, या साऱ्या सबबी बस करा ! आतांचे आतां मला माझे पैसे पाहिजेत !

**सदानंद** : देत नाहीं – पुढं काय म्हणणं आहे ?

**त्रिभुवन** : अस्सं ? माझ्याशीं अशी बदमाषी ?

[ अंगावर धांवून जातो व त्याचा गळा पकडतो. दोघांची झटापट होते. इतक्यांत अलका येते. त्यावर दोघे दूर होतात.

**अलका** : म्हणजे, हें काय ?—

**सदानंद** : कांहीं नाहीं विशेष ! ( त्रिभुवनला ) तुम्ही उद्यां या, मग बघूं—

**त्रिभुवन** : ( रागानें ) उद्यां जर व्यवस्था झाली नाहीं तर माझ्याशीं गांठ आहे लक्षांत ठेवा—

[ घाईनें जातो.

**अलका** : काय भानगड आहे ही ?

**सदानंद** : मला कल्पना नव्हती इतका माथेफिरू असेल हा ! ईश्वर आहे का नाहीं या विषयावर आमची चर्चा चालली होती. आणि एवढ्यावरून तो माझ्याशीं दातघाईला आला.

**अलका** : अस्सं ?

[ जाऊं लागते.

**सदानंद** : कुठं चाललीस ?

**अलका** : वाटेल तिथं. तुम्हाला काय करायचं ?

**सदानंद** : मी येतों पाहिजे तर बरोबर ! आज बाहेर भयंकर खळबळ उडून राहिली आहे ! एकटं जाणं फार धोक्याचं आहे ! हें माथेफिरू सत्याग्रही काय करतील याचा नेम नाहीं—

**अलका** : मी मुख्य प्रधानाची मुलगी आहें. मला कोण काय करणार ?

**सदानंद** : म्हणूनच तर फार भय आहे ! मंत्रिमंडळाविरुद्ध बाहेर लोकमत इतकं खवळलं आहे कांहीं विचारूं नका. सरसाहेब अजून परत आले नाहींत; त्यांचीच मला काळजी लागून राहिली आहे. तरी मी सांगत होतों त्यांना कीं, तुम्ही हें १४४ कलम पुकारूं नका.

**अलका** : म्हणजे, तुम्हीच त्यांना तसं करण्याचा त्या वेळीं सल्ला दिलात आणि आतां असं बोलतां ! तुमचा स्वभाव इतका दुटप्पी असेल अशी मला कल्पना नव्हती ! शरम वाटायला पाहिजे तुम्हांला असं बोलायची !

**सदानंद** : नाहीं म्हणजे – प्रथम माझं तसं मत होतं – पण—

**अलका** : बोलूं नका अगदीं ! आतां मला तुमचं स्वरूप कळायला लागलं. मला नाहीं वाटत आपला दोघांचा स्वभाव फारसा जुळण्यासारखा आहे.

**सदानंद** : नसला जुळण्यासारखा तर जुळवून घेतां येईल, त्यांत काय आहे ! चुकलं असेल माझं. प्रत्येकाच्या स्वभावांत कांहींना कांहीं तरी दोष हे असायचेच. वैवाहिक जीवन हें हल्लींच्या राज्यघटनेसारखं आहे. कांहींही दोष असले तरी तें राबवून घेतलं पाहिजे.

**अलका** : ज्यांना जरूर असेल त्यांनीं घ्यावं. मला त्याची परवा नाहीं !

**सदानंद** : म्हणजे हें काय तूं आज नवीन काढलं आहेस ! आतां सगळं ठरल्यानंतर हे वाद कशाला ? वर्तमानपत्रांत देखील छापून आलं—

**अलका** : तुम्हींच तें पाठवलं असेल, मला का माहीत नाहीं ? आणि वर्तमानपत्रांत छापून आलेलं सगळंच कांहीं खरं असतं असं थोडंच आहे ! त्या दिवशीं बाबांची मनःस्थिति लक्षांत घेऊन मी अर्धवट रुकार दिल्यासारखं केलं, म्हणून सर्वस्वींच तें खरं आहे असं धरून चालू नका.

**सदानंद** : हा मात्र निव्वळ विश्वासघात झाला. हें लग्न मोडलं म्हणजे तोंड दाखवायला मला जागा रहायची नाहीं.

**अलका** : तुमची अब्रू राखण्यासाठीं मी माझ्या आयुष्याचा नाश करून घेऊं काय ? जाऊं द्या. मला वेळ नाहीं तुमच्याशीं बोलायला. आतांचे आतां दिलीपला मला भेटलंच पाहिजे !

**सदानंद** : दिलीपला ? दिलीपचा आणि तुझा आतां काय संबंध ? माझ्यासाठीं नसलं तरी निदान तुझ्या वडिलांच्यासाठीं तरी तुला त्याला भेटतां कामा नये ! तुझ्या वडलांच्या मताचा, अधिकाराचा, त्यांच्या राजकारणाचा जाहीर धिक्कार करणाऱ्या माणसाला अशा वेळीं भेटायला जाणं हा तुझ्या वडलांचा अपमान आहे ! आणि आतां तो भेटणार कसा तुला ?

**अलका** : म्हणजे !

**सदानंद** : ताबुतांतल्या वाघाप्रमाणें तो सत्याग्रहाच्या आघाडीला नाचत असेल या वेळीं ! नाहींतर तुरुंगाची अर्धी अधिक वाटही चालून गेला असेल !

**अलका** : तुरुंगांत जाईन मी त्यांची गांठ घ्यायला—

**सदानंद** : मेहेरबानी कर ! असला अविचार करूं नकोस ! सरसाहेबांना या गोष्टीची कल्पना होतीच. म्हणून परत येईपर्यंत तुला घरांतून बाहेर जाऊं देऊं नये असं त्यांनीं मला सांगून ठेवलं आहे. आणीबाणीची वेळ आहे ही ! दिलीपला तुझी सहानुभूति आहे ही जर गोष्ट बाहेर फुटली, तर सरसाहेबांच्या साऱ्या राजकारणाचा बोजवारा वाजलाच म्हणून समज — ( टेलिफोनची घंटा वाजते. सदानंद टेलिफोनमधून बोलूं लागतो. ) 'हॅलो, कोण, पोलिस सुपरिंटेंडंट ? मी सदानंद – सरसाहेब इथं नाहींत – काय, मी येऊं म्हणतां ? येतोंच – आतां – कांहीं तरी भयंकर प्रकार दिसतो आहे. दंगा झाल्यासारखा वाटतो आहे.' अलका, आतां येतों मी ! मी येईपर्यंत तरी मेहेरबानी करून येथून हलूं नकोस.

[ घाईघाईनें जातो. अलका स्वतःशींच विचार करीत उभी राहते.

**अलका** :

क्षण कां तो आठवतो ?
गोड भाव मनिं हळुच खुलवितो,
भारुनि जिवा टाकतो !
गुंगवी मोहक मृगजळ जीवा,
गमत मधुर प्रेमा तो !

[ इतक्यांत दिलीप येतो.

**अलका** : दिलीप ! आलांत तुम्ही ? मला वाटलं तुम्ही येणार नाहीं ! मी इतक्यांतच तुमच्याकडे यायला निघालें होतें.

**दिलीप** : सरसाहेब नाहींत ना—

**अलका** : ते गव्हर्नमेंट हाउसवर गेले आहेत. अजून अवकाश आहे यायला !

**दिलीप :** कां बोलावलंस मला ! तिकडे माझी सारी फौज खोळंबली आहे—एका क्षणाचीही फुरसत नाहीं मला—

**अलका :** दिलीप, एकाच—एकाच गोष्टीसाठीं मीं तुम्हांला बोलावलं ! तुम्ही एवढे थोर—देशाचे नेते—हजारों तरुणांचे पुढारी—अनाथांचे आधार—दलितांचे कनवाळू—आणि तुम्ही निष्ठुरपणें माझी उपेक्षा करतां—माझ्या प्रेमाचा धिक्कार करतां ! माझ्या हृदयाला पायाखालीं तुडवतां !

**दिलीप :** हें सांगण्यासाठीं तूं मला बोलावलंस ? अलका, प्रेमाचीं रडगाणीं ऐकण्याच्या मनःस्थितींत मी नाहीं ! राष्ट्रसेवेचीं रणशिंगें बाहेर वाजत असतांना, सत्याग्रहाच्या दुंदुभि दाहीं दिशांतून दुमदुमत असतांना वैयक्तिक प्रणयाच्या क्षुद्र गुणगुणण्याकडे कोणाचें लक्ष जाणार ? जातों मी—

**अलका :** थांबा—दिलीप—इतका तुम्ही माझा तिरस्कार करूं लागलांत !

**दिलीप :** मी तुझ्या प्रेमाचा तिरस्कार करीत नसून तुझ्या मानसिक दुबळेपणाचा तिरस्कार करतों आहें ! जोंपर्यंत तुझें मन या विलासाच्या कोंदट वातावरणांत रेंगाळत आहे तोंपर्यंत तुझ्याबद्दल मला कसा आदर वाटेल ? चल, तोड हीं सारीं मोहाचीं बंधनें—झुगारून दे विलासाचे पाश आणि चल माझ्याबरोबर ! राष्ट्रसेवेचा केवढा प्रचंड यज्ञ पेटलेला आहे बाहेर ! मानसिक गुलामगिरीच्या या शृंखला तोडून फेंकून दे—म्हणजे स्वातंत्र्याचें प्रेममय जीवन काय असतं हें तुला कळेल !

**अलका :** तुम्ही म्हणतां हें मला कळत का नाहीं—पण माझ्या पितृप्रेमानें, माझ्या कर्तव्यानें मला परिस्थितीशीं जखडून असहाय केलं आहे—

**दिलीप :** राष्ट्राच्या कर्तव्यापुढें कौटुंबिक कर्तव्याची काय किंमत आहे ? राष्ट्राची हांक तुला ऐकूं येत नाहीं ? सात कोटी अभागी लोकांच्या केविलवाण्या किंकाळ्या अजून तुझ्या कानावर आदळत नाहींत ? दारिद्र्याच्या खाईत जिवंतपणें जळणाऱ्या शेकडों कंगालांचें तें भेसूर कण्हणें अजून तुझीं आंतडीं पिळवटून टाकीत नाहीं ? तुझ्या अंगावर असलेल्या विलासी वस्त्रांच्या मोलांत किती तरी अनाथांना आपली लाज झांकतां येईल ! तुझ्या घरीं सांजसकाळ वाया जाणाऱ्या अन्नाच्या राशीवर किती तरी भुकेकंगाल गरीबांची उपासमार टळेल ! मोहाच्या भोंवऱ्यांतून बाहेर पडल्याशिवाय तुझा विवेक ताळ्यावर

येणार नाहीं! राष्ट्राची आपत्ति हा भोगाचा काळ नसून त्यागाचा काळ आहे!

वाजे नभिं चौघडा। धडधडा!
गगनिं तिरंगी फडकत झेंडा!
समरसमय हा वाजत डंका,
मायदेश तुज मारित हांका!
झुलत आघाडीस हा जरिपटका!

**अलका** : तुमच्या शब्दाशब्दानें मला माझ्या स्वार्थाचा विसर पडला आणि देहांतला कण न् कण जिवंत झाला! दृष्टीला एकदम नवीन तेज दिसलें आणि हृदयाला नवीन सामर्थ्याचा साक्षात्कार झाला. बोला, देशाच्या सेवेसाठीं तुम्ही सांगाल तो त्याग करावयास मी सिद्ध आहें.

**दिलीप** : दारिद्र्याची दीक्षा घेणें हाच त्या त्यागाच्या तपश्चर्येचा आरंभ! उन्मादाच्या भरांत त्या दिवशीं लाथाडलेलें तें पवित्र सेवावस्त्र आतांचे आतां परिधान केल्याशिवाय त्या दिवशींच्या तुझ्या पापाचं परिमार्जन होणार नाहीं! ( बाहेर "भारतमातेचा जयजयकार" "हिंदुधर्माचा उद्धार" "वंदे भारतम्" अशा गर्जना ऐकूं येतात. ) ऐक — दलितांच्या उद्धारासाठीं स्वतःच्या सर्वस्वाची आहुति समर्पण करावयास जाणाऱ्या वीरांच्या या विजयगर्जना ऐक! या ऐकून ज्याचं रक्त उसळ्या मारून बाहेर पडत नसेल तो हिंदुच नव्हे! जातों मी—

**अलका** : थांबा, मी आलेंच—

**दिलीप** : एक क्षणभर देखील थांबायला मला वेळ नाहीं! तुझ्या मनाचा निश्चय झाला असला तर केव्हांही तुला माझ्या मागोमाग येतां येईल! तुझ्या स्वार्थत्यागाच्या सत्कारासाठीं राष्ट्र सदैव सिद्धच आहे.

[ जातो.

**अलका** : पण एक क्षणभर थांबा — आलेंच मी—

[ ती त्याच्यामागें धांवत जाते; पण तो निघून जातो; तोंच समोरून सदानंद येतो.

**सदानंद** : कुठं चाललीस?

**अलका** : दिलीपच्या बरोबर—

**सदानंद** : फिर मागं! दिलीप चाललाय् तुरुंगांत! कसा पळाला मला पाहिल्याबरोबर! जा म्हणावं! असा कडेकोट बंदोबस्त केला आहे पोलिसांनीं देवळासमोर! तो जायचा अवकाश कीं तिथं पडल्याच बेड्या त्याच्या हातांत! आतां मी प्रत्यक्षच पाहून आलों!

**अलका** : खरंच – तिथं गेलं कीं हातांत बेड्या पडतात? तुरुंगांत रवानगी होते? अहाहा, किती मौज असेल नाहीं!

**सदानंद** : मौज! काय बोलतेस काय—

**अलका**: इतका आनंद मला आयुष्यांत कधींच झाला नव्हता! चला, बसलांत काय? येतां का माझ्याबरोबर?

**सदानंद** : कुठं—

**अलका** : तुरुंगांत—

[ हंसत हंसत आंत निघून जाते.

**सदानंद** : अलका – वेड लागलंय् काय हिला?

[ अस्वस्थपणें इकडे तिकडे हिंडतो; इतक्यांत सर गुरुनाथ येतात.

**गुरुनाथ** : काय बेशरम लोक आहेत हे वर्तमानपत्रवाले! आमच्या मंत्रिमंडळानें अधिकारग्रहण केलं म्हणून अभिनंदन करायला तयारी आणि आतां राजिनामे देत नाहींत म्हणून निषेध करायलाही यांची तयारी! सार्वजनिक शांततेचें रक्षण काय वाटेल तें करून झालं पाहिजे, असं एका तोंडानं म्हणतात, तर सार्वजनिक शांततेचा भंग होऊं नये म्हणून एकशें चव्वेचाळीस कलम पुकारलें तर आतां सारे ठणाणा करीत सुटले आहेत! आणि कायहो, काल रात्रींच्या मंत्रिमंडळाच्या खाजगी सभेची बातमी, आजचे आज वर्तमानपत्रांत कशी प्रसिद्ध झाली? मला कळत नाहीं या बातम्या फुटतात कशा?

**सदानंद** : मला देखील त्या बाबतींत कोडंच आहे! मागल्या दोन सभांच्या वेळींही असंच झालं—

**गुरुनाथ** : मंत्रिमंडळ राजिनामा देणार म्हणून खुशाल मोठमोठ्या मथळ्यानें बातम्या देऊन मोकळे झाले आहेत सारे!

**सदानंद** : मला एक विचारायचं होतं. म्हणजे – आमच्या लग्नासंबंधीं—

**गुरुनाथ** : आग लावा तुमच्या लग्नाला ! माझं इकडं डोकं भडकलं आहे आणि तुम्हांला लग्नाच्या गोष्टी सुचतात कशा ? कुठून हें मंत्रिमंडळ बनविण्याची दुर्बुद्धि झाली मला कळत नाहीं ! हे लोकपक्षाचे लोक इतके कारस्थानी असतील अशी मला कल्पना नव्हती ! आतांपर्यंत माझ्याकडून आपापलीं कामें साधून घेणारे सभासद आतां खुशाल लोकपक्षाच्या मॅनिफेस्टोवर सह्या करून त्यांच्या गोटांत सामील झाले—

[ गडी टपाल आणून देतो.

**सदानंद** : पण आमच्या मराठा लीगचे सभासद तरी—

**गुरुनाथ** : बस करा तुमच्या मराठा लीगचे सभासद ! त्यांच्यापेक्षां त्या मोटेच्या बैलांना देखील अधिक अक्कल असेल ! कोणत्याही पक्षाच्या सभासदांवर आतां माझा विश्वास नाहीं ! सारे विश्वासघातकी ! ( टेबलावरील टपालापैकीं एक पत्र फोडून व तें वाचून ) म्हणजे, व्हॉटस् धिस् ! मला कळत नाहीं ! एडिटर बॉनफायर ! याचा काय संबंध—

**सदानंद** : माझं पत्र असेल तें—

**गुरुनाथ** : तुमचं ! आणि पांचशें रुपयांचा चेक कशाला पाठविला आहे तुम्हांला त्यानं ! ( वाचून ) व्हॉट ! कॉन्फिडेन्शल रिपोर्ट पाठविल्याबद्दल मंत्रिमंडळाच्या राजिनाम्याचा ?

**सदानंद** : कांहींतरी गफलत झाल्यासारखी दिसते – माझा कांहीं संबंध नाहीं.

**गुरुनाथ** : नो – नो – नो ! धिस इज रॉट्न् ! मीन ! आतां मला कळलं ! मला एकदम तुमचं एक्स्प्लेनेशन पाहिजे ! बॉनफायर पत्रांत माझ्या राजिनाम्याबद्दल मजकूर इतरांच्या आधीं कसा आला, हें आतां माझ्या ध्यानांत आलं—

[ सोमेश्वर व कादरखान प्रवेश करतात.

**कादरखान** : बॉनफायर पत्रांत काय – पण झाडून साऱ्या पत्रांत मंत्रिमंडळाच्या राजिनाम्याची खबर जाहीर झाली आहे.

**सोमेश्वर** : मला हें परवांचे दिवशींच कोणीतरी सांगितलं; पण माझा विश्वासच मुळीं बसेना ! पण आतां मीं स्वतःच वाचलं तेव्हां खात्री झाली !

लोकपक्षाच्या पुढाऱ्यांना मंत्रिमंडळ बनविण्यासाठीं गव्हर्नरसाहेबांनीं आमंत्रण देखील केलं असंही मला कुणीं सांगितलं !

**कादरखान** : म्हणून तर मी धांवत आलों, म्हटलं प्रत्यक्ष यांनाच जाऊन विचारावं !

**गुरुनाथ** : तुम्ही काय समजतां मला ! घरांतून उठतां ते थेट इथं येतां ! काय वाटतं काय, तुम्हांला ? गांवांतल्या गटारगप्पांना उत्तर देण्यासाठीं मी कांहीं कचेरी उघडली नाहीं इथं—

**कादरखान** : तुम्हीं राजीनामा दिला म्हणून आम्हाला काय आहे म्हणा त्याचं—

**सोमेश्वर** : हें मंत्रिमंडळ गेलं तर त्याचा बाप दुसरं मंत्रिमंडळ येणारच ! आम्हांला काय त्याचं सोयीरही नाहीं आणि सुतकही नाहीं !

**कादरखान** : आमच्या ऑनररी मॅजिस्ट्रेटशिपचं काय केलंत ? जायच्या पूर्वीं तेवढं तरी करून टाका !

**सोमेश्वर** : आणि आमच्या देवळाच्या प्रकरणाचा तर तुम्हीं विचका करून टाकलांत ! तुम्हांला कुणीं सांगितलं होतं हें कलम पुकारायला ? तुम्हीं हा दडपशाहीचा हुकूम पुकारण्याचें धोरण बाळगलं नसतं तर सत्याग्रही मंडळींचा हल्ला आज आमच्या देवळांवर कदापि झाला नसता ! कालपासून खुनाच्या धमक्याचीं दहा पत्रें आलीं मला ! ही लोकपक्षांतील माथेफिरू मंडळी खरंच माझा जीव घ्यायची ! प्राणापेक्षां देवळाची काय परवा हो ?

**गुरुनाथ** : शरम नाहीं वाटत तुम्हांला असं बोलायला ! काल एक बोललां आणि आज अशी भाषा करतां ! काय वाटेल तें करून मांदिराचं रक्षण करा म्हणून काल डोकं घाशीत होतां आणि आज म्हणतां हा प्रवेशबंदीचा हुकूम कां काढलांत म्हणून ! तुमच्यासारखे मूर्ख लोक जिथें भरले आहेत तिथें कोणत्याही मंत्रिमंडळाचा बोजवारा वाजल्याशिवाय रहाणार नाहीं—

**कादरखान** : हें पहा, माझ्या स्वतःबद्दल म्हणाल तर मला कांहीं आपली मेहरबानी नको. आम्हांला ऑनररी मॅजिस्ट्रेट करणार नसलां तर आमचे पैसे आम्हांला देऊन टाका—

**गुरुनाथ** : पैसे ! काय बोलतां काय ?

**सोमेश्वर :** आणि आमच्या ' मुष्टिमोदक ' पत्राचा जामीन पोहोचल्याची पावती घेतलीत आणि पैशाचा अजून पत्ता नाहीं !

**गुरुनाथ :** म्हणजे काय वेड लागलंय का तुम्हांला ? कुणी पैसे घेतले तुमचे ? आणि कुणीं पावती घेतली तुमची ?

**कादरखान :**
**सोमेश्वर :** } सदानंद – विचारा त्यांना —

**गुरुनाथ :** खरं आहे हें ?

**सदानंद :** मी मागाहून सांगेन ती सारी भानगड समजावून ! त्यांचा गैरसमज झाला आहे—

**कादरखान :** गैरसमज ! भले, हजार रुपये दिले आहेत तुम्हांला !

**सोमेश्वर :** आणि मीं दीड हजाराची पावती दिली आहे !

**गुरुनाथ :** बॉनफायरचे पांचशें, तुमचे हजार, यांचे दीड हजार ! काय केलं तरी काय पैशांचं या ! आतांचे आतां मला खुलासा पाहिजे ! इतका बदमाष असशील याची कल्पना नव्हती मला. लहानपणापासून मीं तुला इतकी मदत केली. तुझ्यावर मीं इतका विश्वास टाकला ! तुला स्वतःची मुलगी द्यायला तयार झालों ! यू हॅव्ह रुइन्ड मी प्रॅक्टिकली !

**कादरखान :** हें पहा, आम्हांला तुमचं हें काय करायचं आहे ! तुमचं तुम्ही पाहून घ्या—

**सोमेश्वर :** ही नुसती सिद्धसाधकगिरी दिसते आहे !

**सदानंद :** तुम्ही आपला इतका गैरसमज करून घेतला आहेत ! आतां मीं सांगण्यांत काय अर्थ आहे ? त्यापेक्षां गप्प बसलेलंच बरं.

**गुरुनाथ :** जीभ खेंचून बाहेर काढीन आणि बोलायला लावीन ! आतांच्या आतां पोलिसांच्या ताब्यांत देईन आणि तुरुंगांत पाठवीन !

[ अलका खादीचें पातळ नेसून आनंदानें नाचत येते.

**अलका :** तुरुंगांत – खरंच पाठवा ! त्यांना नका पाठवूं ! मला पाठवा ! नाहीं तर आपण सारेच तुरुंगांत जाऊं !

**गुरुनाथ :** कोण अलका – अलका तूं ?

**अलका :** नाहीं – नाहीं तुम्हीं मला ओळखलंत ? आज माझा खरोखरच

पुनर्जन्म झाला ! तुम्ही मला कसे ओळखणार ? परदेशी पोषाखाच्या पापी पाशांत गुरफटलेली कालची अलका मेली ! आजची अलका मातृभूमीच्या प्रेमानें शुद्ध झालेली आहे !

**गुरुनाथ** : काय झालंय तुला ? सारं जग आज फिरल्यासारखं वाटतंय मला !

**अलका** : जगाबरोबर तुम्ही फिरलांत म्हणजे जग तुम्हांला फिरल्यासारखं वाटणार नाहीं ! लोकगंगेच्या प्रचंड प्रवाहाला विरोध करूं नका ! चला. गुलामगिरीचीं हीं सारीं चिन्हें फेंकून द्या ! मातृभूमीच्या सेवेसाठीं सर्वस्वाचा त्याग करा – चला, बघतां काय ?

**गुरुनाथ** : चला – कुठं ?

**अलका** : माणुसकीच्या प्रेमाला मुकलेले शेंकडों दलित तुमच्या हाताच्या स्पर्शासाठीं तडफडत आहेत – तुमच्या दयेच्या एका थेंबासाठीं आपले प्राण पाखडत आहेत ! त्या दीन दुबळ्यांच्या आरोळ्या तुम्हांला, मला, आपणां सर्वांना बोलावीत आहेत. चला. दलितांचा उद्धार हीच खरी देशसेवा !

**गुरुनाथ** : ( रागानें ) काय, तूं आज त्या सत्याग्रहांत सामील होऊन मीं केलेला कायदा मोडणार ? म्हणजे मला जगांत तोंड दाखवायला तरी जागा राहील का ?

**अलका** : माणुसकीच्या हक्कांची पायमल्ली करणारे जुलमी कायदे प्रत्यक्ष पित्यानें घडविलेले असले तरी ते मोडायला त्याच्या मुलीबाळी मागेंपुढें पहाणार नाहींत हींच आजच्या काळाचीं चिन्हें आहेत ! उलट तुम्हीं केलेला हा अन्यायी कायदा तुम्हींच मोडलांत तर सारी दुनिया तुम्हांला डोक्यावर घेऊन नाचेल ! आणि तुमच्या देशसेवेचं कौतुक करील. चला, ऐका, त्या नव्या युगाच्या नौबती ऐका ! चला, मानवतेच्या हक्कसंरक्षणाच्या या युद्धांत उडी टाका ! आजचा काळ विलासाचा नाहीं; तपश्चर्येचा आहे ! भोगाचा नाहीं; त्यागाचा आहे !

[ धांवत जाते.

**गुरुनाथ** : अलका – अलका – सदानंद, बघतां काय ? धांवा, तिला माघारी आणा—

**सदानंद** : जी स्वतःच्या बापाला ऐकत नाहीं ती मला काय ऐकणार ?

**गुरुनाथ :** म्हणजे, माझ्या आजपर्यंतच्या देशसेवेचा आणि राजकारणाचा निकालच लागला—

**सोमेश्वर :** पांच हजार वर्षांच्या सनातन धर्माचा जिथें निकाल लागायची वेळ येऊन ठेपली आहे तिथं तुमच्या राजकारणाचा निकाल लागल्याबद्दल खंत कशाला !

**गुरुनाथ :** सदानंद, आतांच्या आतां साऱ्या दिवाणांना टेलिफोन करा—

**कादरखान :** आमच्या प्रकरणाचा तुम्हीं निकाल लावला नाहींत तर—

**गुरुनाथ :** चालते व्हा इथून ! इथं माझ्या सर्वस्वाचा सत्यानाश होण्याची पाळी आली आहे ! बेअरर—

**सोमेश्वर :** चला, कादरखान आतां कसला निकाल मागतांय् ? हा निकालच लागला ! आतां आमच्या देवळाचा निकाल लागला नाहीं म्हणजे मिळवली !

**कादरखान :** मग, आधीं जाऊन त्या त्रिभुवनचं नरडं पकडलं पाहिजे; नाहींतर हेहि पैसे जायचे आणि तेहि पैसे जायचे !

[ दोघे घाईघाईनें निघून जातात.

**गुरुनाथ :** बघतां काय सदानंद, मी सांगतों तें ऐकूं नाहीं आलं काय ?

**सदानंद :** अलका हातांतून गेली ! आतां तुमच्या मेहेरबानीची काय परवा ! चाललों मी !—

**गुरुनाथ :** कुठं चाललांत ?

**सदानंद :** जातों कुठं तरी ! नाहींतर लोकपक्षाला जाऊन मिळतों ! उगवत्या सूर्याची पूजा करणं हेंच माझं राजकारण !

**गुरुनाथ :** काय बेशरम आहांत !

[ सदानंद निघून जातो. गुरुनाथ त्याच्याकडे पहात उभा राहतो.

# [ २ ]

कल्याण व जयंती प्रवेश करतात.

**कल्याण :** सोड माझा हात—

**जयंती :** नाहीं सोडणार—

**कल्याण** : पण मला अडवतेस कां ? मी का पळून चाललों आहे ?

**जयंती** : पळूनच चाललां होतां तुम्ही ! सहभोजनाच्या पंक्तींत मी तिकडे वाढण्यांत गुंतलें आहें असं बघून तुम्ही हळूच इकडे निसटलांत ! म्हणून मी तें झुणक्याचं पातेलं तसंच खालीं टाकून तुमच्या मागें धांवत आलें—

**कल्याण** : येशील तर काय झालें ! हात तरी धुतलेस का ? सगळा बोटांना झुणका लागला आहे—

**जयंती** : लागूं द्या लागला तर ! हात धुऊन तुमच्या मागं धांवत आलें असतें तर हात धुऊन माझ्या पाठीमागें कां लागलीस म्हणून म्हणाला असता तुम्ही ! म्हणे हात सोड ! तुमच्या पावलावर पाऊल टाकून आणि हातांत हात घालून मी तुमच्या मागें आलें तें काय तुमचा हात सोडून जाण्यासाठीं होय ? सांगा कुठं निघालांत तें !

**कल्याण** : तुला तें सांगण्यासारखं असतं तर आधींच नसतं का सांगितलं ?—

**जयंती** : तुमचं माझ्यावर प्रेम असतं तर तुम्हीं असं माझ्यापासून चोरून ठेवलं नसतं !

**कल्याण** : आतां काय सांगावं ? अग, तुझ्यावर माझं प्रेम आहे म्हणूनच तर तुला सांगण्याचं धैर्य होत नाहीं ! कांहीं कांहीं गोष्टी जिवलग माणसांना सांगणं अगदीं जिवावर येतं !

**जयंती** : पण त्यामुळें दुसऱ्याचा जीव जातो त्याची काय वाट ? नसेल सांगायचं तर नका सांगूं ! कुठं जातां तें सगळं मला ठाऊक आहे, समजलं ! काय मला गाढव समजतां ?

**कल्याण** : तुला जर मी गाढव समजलों असतों तर तुझ्याशीं लग्न लावायला कसा तयार झालों असतों ! खरं सांगूं ! तुला सारं माहीत आहे हें मला माहीत होतं म्हणूनच मी तुला सांगण्याच्या भानगडींत पडलों नाहीं.

**जयंती** : मग मी तुम्हांला सांगतें कीं मी तुम्हांला जाऊं देणार नाहीं !

**कल्याण** : असं काय करतेस ? कोटेश्वराच्या मंदिरांत आज प्रवेश करणाऱ्या सत्त्याग्रही पथकाचा मी पुढारी आहें. प्रवेशबंदीचा आजच पुकारला गेलेला अन्यायी कायदा मोडून त्या मंदिरांत शिरण्याचा आमच्या अस्पृश्य बांधवांचा हक्क प्रस्थापित करणें हें माझें कर्तव्य आहे ! लोकपक्षाच्या पुढाऱ्यांनीं माझ्यावर लादलेली जबाबदारी मी भ्याडाप्रमाणें झुगारून देऊं म्हणतेस ? बाजूला हो,

कायदेभंग करून तुरुंगांत जाणाऱ्या या देशभक्त वीराच्या वाटेंत आडवें येण्याचें पातक करूं नकोस—

**जयंती :** वीर पुरुष आपल्या वल्लभेचा निरोप न घेतां असे नामर्दासारखे मागल्या दारानें पळून जात नाहींत कधीं ! तुम्ही तुरुंगांत गेल्यानंतर मी काय करूं ? का हीं झुणकाभाकरीचीं खरकटीं काढीत बसूं !

**कल्याण :** वीरांगने, वीरांगने, अशी हताश होऊं नकोस ! तुरुंगांत गेलेल्या आपल्या प्रियकराचें चिंतन करीत त्याच्या वाटेकडे डोळे लावून बसणें यांत किती उदात्त स्वरूपाचें राष्ट्रीय काव्य भरलेलें आहे ! आपला वल्लभ तुरुंगांत गेला आहे असं सांगण्यांत आजकालच्या तरुणींना केवढा अभिमान वाटतो ! एवढंच नव्हे तर कॉलेजमध्यें जाणाऱ्या तरुण विद्यार्थ्यांपेक्षां तुरुंगांत जाणाऱ्या तरुण देशभक्तावरच आजकालच्या पोरी बेहद्द खूष असतात !

**जयंती :** मला तुमच्यावांचून एक क्षणभर देखील करमत नाहीं ! तुम्ही तुरुंगांत गेलां तर मी आत्महत्या करीन !

**कल्याण :** छेः छेः, भलतंच काय ! मी तुरुंगांत गेल्यावर तुला केवढा भाव येईल याची कल्पना आहे ? माझ्या शिक्षेच्या निषेधासाठीं तुला सभा बोलावतां येईल—मदतीसाठीं फंड गोळा करतां येईल—हां हां म्हणतां तूं देशसेविका बनशील ! आणि स्त्रियांची पुढारीण बनशील ! आहेस कुठं !

**जयंती :** पण तुरुंगांत गेल्याशिवाय देशसेवा करतां येत नाहीं असं थोडंच आहे !

**कल्याण :** अगदीं वेडी आहेस ! एक वेळ निवडणुकींत मतदारांना पैसे चारल्याशिवाय एखाद्याला निवडून येतां येईल, शिक्षणाचा गंध नसला तरी एखाद्याला स्थानिक स्वराज्यांत अध्यक्षपद मिळवितां येईल, पण तुरुंगांत गेल्याशिवाय देशभक्त होणं हे आजकाल कोणालाहि शक्य नाहीं. तुरुंगाच्या बाहेर राहून वर्षानुवर्षे राजकारण करणाऱ्या एखाद्या बुड्ढ्या मवाळापेक्षां दोन महिने तुरुंगाची वारी करून येणाऱ्या ताज्यातवान्या तरुणाचें नांव लोकांच्या तोंडीं होतं तें काय उगाच ?

**जयंती :** पण तुम्हीं मला लग्नाचं वचन दिलं आहे ! तें आधीं पुरें करा आणि मग पुढच्या गोष्टी बोला ! एकदां लग्न लागून तुम्ही माझे बांधील झालांत

म्हणजे मग मात्र तुम्हांला मनाला मानेल तशी स्वतःच्या आयुष्याची विल्हेवाट लावतां येणार नाहीं !

**कल्याण** : असं भलतंसलतं बोलून माझ्या देशभक्तीच्या पेटलेल्या आगींत घासलेट ओतूं नकोस ! आम्ही देशभक्त आमच्या देशापुढें—आमच्या राष्ट्रापुढें—आमच्या ( थांबून )—याच्यापुढें लग्नाची—कुटुंबाची—घरादाराची—नात्याची यत्किंचितही पर्वा करीत नाहीं ! आमच्या सर्वस्वाची राखरांगोळी करावयाला आम्ही सदैव सिद्ध असतों. देशभक्ति हें एक दिव्य आहे. हा एक यज्ञ आहे—हा एक होम आहे ! पूर्वीच्या काळीं रजपूत वीर रणांगणावर जाण्याआधीं आपल्या बायकामुलांना बळी देत असत, ठाऊक आहे ?

**जयंती** : तसा तुम्ही माझा बळी देऊन टाका म्हणजे मला तुमच्यासाठीं मागें रडत बसायला तरी नको.

[ रडूं लागते.

**कल्याण** : हं—हं—हें काय ? रडतेस ? तुला रडतांना पाहून माझ्या काळजांत कसंसंच होऊं लागलं आहे ! आटप, पूस ते डोळे ! नाहींतर मला देखील रडूं कोसळेल ! म्हणजे मग आमच्या निश्चयाचा मनोरा कोलमडलाच म्हणून समजा—( ती डोळे पुसते. ) छेः छेः, गंगायमुनांच्या विशाल पात्रावर प्रचंड पूल बांधणारे एंजिनियर निघाले, पण बायकांच्या डोळ्यांतून वाहणाऱ्या या गंगायमुनांवर समाधानाचे पूल बांधण्याचें काम ब्रह्मदेवाच्या बापालाही साधायचं नाहीं.

**जयंती** : कल्याण, तुम्ही पुरुष किती निष्ठुर असतां ? तुम्हांला आमच्या अंतःकरणाची कल्पना नसते ! दिवसभर उन्हातान्हांत काम करून तुम्ही दमलांत—तुमच्या पोटांत अद्यापि अन्नाचा कण तरी आहे ? घटकाभर सांवलींत निवांतपणें बसलां असतां म्हणजे मग मी तुम्हांला पदरानें वारा घातला असता आणि माझ्या हातानें झुणकाभाकर खाऊं घातली असती—

**कल्याण** : मेलों—मेलों—अगदीं ठार झालों ! तुझ्या हातची झुणकाभाकर ! नुसत्या कल्पनेनेंच माझं पोट भरलं ! झुणकाभाकरीसारख्या रूक्ष विषयांत काव्य निर्माण होऊं शकेल याची मला कल्पना नव्हती !

**जयंती** : इतकं प्रेम आहे तुमच्यावर माझं ! आणि मला सोडून तुम्ही चाललां

कुठं ? तुम्ही माझ्या जीवनाचे प्रकाश आहांत ! पडछाया सोडून प्रकाशाला जातां येईल का कुठं ?

राजस राया, दाविसि माया, जीवन तुजविण वाया !
तूं प्रीतीचा प्रकाश मोहक, केवळ मी तव पडछाया !
चांद हांसरा तूं, मी तारा, अससि प्राण तूं, मी काया !

**कल्याण** : लग्न व्हायच्या आधींच तुझं इतकं प्रेम — मग लग्न लागल्यानंतर हें प्रेमाचं भांडवल चक्रवाढव्याजानेंच वाढेल कीं !

**जयंती** : तुम्ही जाल तेथें मी तुमच्या मार्गें येणार ! तुम्ही सत्याग्रहाला निघालांत ना ? चला, मीही तुमच्याबरोबर येतें !

**कल्याण** : म्हणजे — तूं माझ्याबरोबर तुरुंगांत येणार कीं काय ?

**जयंती** : हो —

**कल्याण** : आर्ये, पतिव्रते, वीरांगने, काय हें ? अग इतिहासांत तुझं नांव अजरामर होईल !

**जयंती** : होऊं द्या — तुमच्याबरोबर माझंही नांव अमर झालं तर काय हरकत आहे !

**कल्याण** : आतां मात्र कायदेभंग करून तुरुंगांत जाण्याची बेफाम वीरश्री माझ्या अंगांत चढली ! असली गृहिणी मिळाल्यावर जन्मभर चतुर्भुज कोण होणार नाहीं ? चल, असेच्या असे आपण एका फोटोग्राफरकडे जाऊं —

**जयंती** : तें कशाला ?

**कल्याण** : कशाला म्हणजे फोटो काढायला ! उद्यां आपण बरोबरीनें तुरुंगांत गेलों म्हणजे वर्तमानपत्रांत आपला दोघांचा एकत्र फोटो नको का यायला ? तुरुंगांत जाण्यापेक्षां आपला फोटो वर्तमानपत्रांत आधीं छापून येणें हें जास्त महत्त्वाचं आहे !

[ जाऊं लागतात; तोंच त्रिभुवन येतो.

**त्रिभुवन** : कशी सांपडलीस ! तोंड चुकवीत होतीस नाहीं का इतके दिवस ? चल घरीं —

**कल्याण** : अहो मेहेरबान, व्हा बाजूला ! खुशाल जवळ येताय् कीं ! कोण ग हा ?

**जयंती** : हे – हे—

**त्रिभुवन** : म्हटलं मी हिचा भाऊ आहे. तूं कोण आहेस ?

**कल्याण** : तुम्ही तिचे भाऊ नाहीं का ? हो, आतां आठवलं ! त्या दिवशीं सांगितलंत तें ! मग तुम्ही तिचे भाऊ असलांत तर मी आपला मेहुणा आहें !

**त्रिभुवन** : मेहुणा – म्हणजे !

**कल्याण** : म्हणजे ! अहो, म्हणजे म्हणजे काय ! मेहुणा म्हणजे बहिणीचा नवरा, समजलं !

**त्रिभुवन** : खूपच बेशरम आहांत कीं ! धडधडीत माझ्या तोंडावर खोटं बोलतां ! ही तुमची बायको काय ?

**कल्याण** : मला कशाला, तिलाच विचारा !

**जयंती** : होय, यांच्याशीं मीं लग्न करायचं ठरविलं आहे !

**कल्याण** : ठरवलं कसलं ! आजच सकाळीं लग्न ठरलं – लागलं – संपलं देखील सगळं ! आतांच मांडवपरतणं उरकून बाहेर पडलों – आहांत कुठं ?

**त्रिभुवन** : मी हिचा थोरला भाऊ आहें. माझ्या परवानगीवांचून हिला मुळीं लग्न लावतांच येत नाहीं.

**कल्याण** : परवानगी विचारून लग्न लावायचा तो काळ संपला म्हटलं मेहेरबान ! आतां नवीन जमाना सुरू झाला आहे ! याची परवानगी विचार आणि त्याची संमति विचार, कुंडल्या तपास, जात पहा न् गोत बघा या भानगडी येथून पुढें कटाप !

**त्रिभुवन** : जातगोत न विचारतां विवाह करणारीं माणसं हिंदु धर्मांत असूं शकतात ?

**कल्याण** : असूं शकतात म्हणून काय विचारतां ? हा तुमच्यापुढं जिवंत पुरावा उभा आहे कीं !

**त्रिभुवन** : म्हणजे, तुझी जात तरी कोणती !

**कल्याण** : माझी जात ! माझी जात काय करायची तुम्हांला ! मी कांहीं महार नाहीं ! घाबरूं नका—

**त्रिभुवन** : म्हणजे, तूं महार नाहींस ? मग कोण आहेस ?

**कल्याण** : भले शाबास, तोंडावरून मी काय महार दिसतों आहें ! म्हटलं, चांगला शंभर नंबरी ब्राह्मण आहें मी !

**त्रिभुवन** : तूं आणि ब्राह्मण ! शक्य नाहीं—

**कल्याण** : शक्य काय नाहीं ! आमच्या वडिलांचा अपमान करताय् कीं तुम्ही ! तुम्हांला काय वाटलं कीं पंचा नेसून नि पळीपंचपात्री घेऊन रस्त्यावरून धांवणारा शेंडीवाला बावळट प्राणी म्हणजे ब्राह्मण होय ! हा साहेबांच्या टेबलावर बसून कांटाचमचा चालवणारा ब्रिटिश अमदानींतला ब्राह्मण आहे !

**त्रिभुवन** : पण खरा ब्राह्मण प्राण गेला तरी महाराच्या मुलीशीं लग्न करणार नाहीं—

**कल्याण** : कोण महाराची मुलगी ?

**त्रिभुवन** : म्हणजे, हिची जात माहीत नाहीं काय तुला ? प्रसिद्ध धर्मांतरवादी अस्पृश्य पुढारी त्रिभुवन तो मी – ही माझी बहीण ! माझी जात तरी माहीत आहे ना ?

**कल्याण** : थांबा, मला कसंसंच वाटूं लागलं ! बोलूं नका जरा—

**त्रिभुवन** : ( जयंतीस ) तूंच याच्यापासून सारं लपवून ठेवलेलं दिसतंय् !

**जयंती** : मुळींच नाहीं ! मी महाराची आहें असं त्याच दिवशीं स्पष्ट यांना सांगितलं आहे ! नाहीं का हो ?

**कल्याण** : बोलूं नको – मला फिरल्यासारखं वाटतंय् ! खालीं बसूं दे जरा !

[ खालीं बसतो. ती त्याला वारा घालते.

**जयंती** : कां हो, असं कां वाटतंय् !

**कल्याण** : फारच भयंकर सुधारणा हातून घडते आहे. डोकं खलास झालं !

**जयंती** : उगाच नका कांहीं तरी बोलूं ! उन्हांत उभे राहून श्रम केलेत ना सकाळभर, म्हणून असं वाटतंय् – उठा !

**त्रिभुवन** : चल, चार पावलें चाललें कीं पटकन् खालीं बसणाऱ्या या भातखाऊ भटांच्या पोरांच्या काय नादीं लागलीस ! फार बदमाष आहेत हे लोक ! अस्पृश्यांच्या मुलींशीं हे लग्न लावतील ? ती गोष्ट सोडून दे ! चल माझ्यावरोबर. दोन दिवसांनीं धर्मांतर झाल्यावर तुझा निका लावून टाकीन

एखाद्या फक्कड माणसाशी ! या नादान हिंदुधर्मांत तुझ्या लायकीचा एकही नवरा नाहीं !

**कल्याण :** ( एकदम उठून ) काय म्हणालांत ? नादान हिंदुधर्मांत हिच्या लायकीचा एकही नवरा नाहीं ! ( अस्तन्या सरसावून ) परत घ्या ते शब्द — परत घ्या ते शब्द — माझ्या तोंडावर माझी बदनामी करतां !

**जयंती :** ( त्याला अडवून ) मार्गे सरा.

**कल्याण :** माझी बदनामी मी एक वेळ सहन करीन ! पण माझ्या हिंदुधर्माची बदनामी करतो ? दाताड फोडीन !

**त्रिभुवन :** बस कर तुझं हिंदुधर्माचं थोतांड ! आजपर्यंत तुम्हीं हिंदूंनीं — तुम्हीं ब्राह्मणांनीं — आम्हांला पांच हजार वर्षें पायांखालीं तुडवलंत !

**कल्याण :** पांच हजार वर्षें पायांखालीं तुडवलं असलं, तर दहा हजार वर्षें तुम्हांला डोक्यावर घेऊन आम्ही नाचायला तयार आहोंत ना ! धर्मांतर कशाला करतांय् ? हिंदु लोकांनीं आजपर्यंत हिमालयाएवढ्या घोडचुका केल्या असल्या तरी त्या धुऊन काढायला लागणारं हिंदी महासागराएवढं औदार्यही हिंदु लोकांतच आहे हें पक्कं लक्षांत ठेवा ! या उप्पर तुम्हांला जर हिंदुधर्म सोडायची अवदसा आठवली तर आजच्या नव्या युगांतला हिंदु तुम्हांला आपल्या प्रेमाच्या पाशानें हिंदुधर्मांत असा खेचून नेल्याशिवाय रहाणार नाहीं !

[ जयंतीच्या गळ्यांत हात घालून तिला घेऊन जातो.

**त्रिभुवन :** ए — जरा थांब — काय बेवकूफ आहे !

[ जाऊं लागतो तों मागून कादरखान येतो व त्याच्या खांद्यावर हात टाकतो.

**कादरखान :** सलाम अलेकुम् !

**त्रिभुवन :** हं — हं — अलेकुम् सलाम ! मी जरा आतां घाईत आहें. पुन्हां भेटूं—

**कादरखान :** पुन्हां केव्हां भेटूं ? छपन्न वेळां घरीं येऊन गेलों; पण पत्ता असेल तर शपथ !

**त्रिभुवन :** मी अस्पृश्यांचा पुढारी आहें. घरीं बसून काय करूं ? धर्मांतराच्या प्रचारासाठीं चोवीस घंटे हिंडावं लागतं ! सगळ्या लोकांचीं मनं तर वळवायला पाहिजेत ना !

**कादरखान :** बाकीच्या लोकांचं राहूं द्या—तुम्ही आमच्या धर्मात केव्हां येणार तें सांगा !

**त्रिभुवन :** त्याच तयारींत आहें मी ! घरांत तुळशीच्या ऐवजीं सबजा लावला ! धोतरं फाडून लुंग्या तयार केल्या—सगळ्या भांड्यांना बाहेरून कल्हई करून आणली—

**कादरखान :** मग आतां अडलंय् कुठं ?

**त्रिभुवन :** तुमानी अन् शेरवान्या करायला शिंप्याकडे टाकल्या तर तो लेकाचा कापडासकटच कुठें पसार झाला ! काय काय अडचणी असतात धर्मांतराच्या बाबतींत एकेक—

**कादरखान :** हें पहा, असल्या थापा तुम्ही दुसऱ्यापुढं जाऊन मारा—

**त्रिभुवन :** आणि तशांत धर्मांतरासाठीं मुहूर्त पहातों आहें—पण अजून सांपडला नाहीं !

**कादरखान :** मुसलमान व्हायला मुहूर्त लागत नाहीं !

**त्रिभुवन :** पण अजूनपर्यंत तरी मी हिंदु आहें ना ! आम्ही हिंदु मुहूर्ताशिवाय कांहींच करीत नाहीं ! धर्मांतरासारखी बाब आहे ! ती वाटेल त्या दिवशीं थोडीच करतां येते !

**कादरखान :** पैसे घ्यायला मुहूर्त पाहिला होता काय ? त्या वेळीं मात्र असे हातघाईला आलां होतां—

**त्रिभुवन :** काय बकवा लावला आहांत पैशाचा ! अजून कवडीदेखील माझ्या हातांत पडली नाहीं. सारे पैसे सदानंदाजवळ आहेत. त्याचीच जाऊन मानगूट पकडा—

**कादरखान :** तें आम्ही जाणत नाहीं. सदानंद आणि तुम्ही तें पैशाचं परस्पर पाहून घ्या. आम्हीं तुम्हांला पैसे दिले आहेत—

**त्रिभुवन :** पैसे—पैसे काय करताहांत ! पांच हजार रुपड्यांची मिजास ती काय ! तुमच्या चौपट पैसे हिंदु लोक आतां माझ्यापुढें ओतायला तयार आहेत. मीच त्या धर्मात रहायला तयार नाहीं ती गोष्ट निराळी ! आणि त्या दिवशीं मीं तें तुम्हांला आश्वासन मागितलं होतं तें तुम्हीं अद्यापिही दिलं नाहीं !

**कादरखान** : कसलं आश्वासन ?

**त्रिभुवन** : विसरलांत का ? हें पहा मी अस्पृश्य आहें. म्हणून लोक मला पुढारी मानतात. उद्यां मुसलमान झालों आणि तुमच्या दाढीवाल्या अहमद-अल्ली – महमदअल्लीमध्यें मिसळून गेलों म्हणजे पत्ता लागायचा नाहीं माझा ! म्हणून म्हणतों कीं तुमच्या धर्माचा स्वीकार केल्यानंतर माझं पुढारीपण मंडळींना मान्य आहे असं लेखी आश्वासन पाहिजे मला अगाऊ !

**कादरखान** : असं कोण आश्वासन देईल ?

**त्रिभुवन** : मग आपला तरी कुठं आग्रह आहे ? आश्वासन नाहीं तर धर्मांतराचा प्रश्नच मिटला अजिबात ! आहोंत हिंदु तें काय वाईट आहे !

**कादरखान** : आतां तुमचा कावा माझ्या लक्षांत आला ! धर्मांतराच्या नांवाखालीं तुम्हीं धडधडीत दरवडा घातला माझ्या पैशावर ! पांच हजार रुपये बुडाले माझे !

**त्रिभुवन** : बुडाले कसले ! धर्माच्या नांवावर खर्च झाले ! त्याचं पुण्य तुम्हांला मिळाल्याशिवाय रहाणार नाहीं ! स्वर्गात जाल तुम्ही !

**कादरखान** : मी स्वर्गात जाण्याच्या आधीं तुला नरकांत रवाना करतों.

[ त्याच्या अंगावर धांवून जातो.

**त्रिभुवन** : हं मागें व्हा, माझ्या अंगाशीं लगट करण्याचें कारण नाहीं ! कायद्याप्रमाणें वागा ! कायद्याप्रमाणें वागा !

**कादरखान** : कायदा राहिला कोर्टात ! आमच्याशीं विश्वासघात करणाऱ्या लोकांस आम्ही हा कायदा दाखवतों —

[ ठोसा मारायला जातो. त्रिभुवन पळतो. इतक्यांत माणिक त्या बाजूनें येते.

**माणिक** : ( त्रिभुवनास अडवून ) कुठं पळून चाललांत ! माझ्या पैशावर डल्ला मारून माझ्याशीं विश्वासघात करतां ?

[ त्रिभुवन मागें वळतो, तोंच त्याचा हात कादरखान धरतो.

**कादरखान** : माझ्या पैशावर दरवडा घालून माझ्याशीं निमकहरामी करतो.

**माणिक** : ( त्याचा हात पकडून ) सोडा त्यांचा हात – मी पाहून घेतें त्यांना—

**कादरखान** : तुम्ही सोडा त्याचा हात ! मी पाहून घेतों त्याला—

**माणिक** : तुमचा काय संबंध —

**कादरखान** : आणि तुमचा तरी काय संबंध?

**माणिक**: मीं यांच्या डोक्यांवर पांचशें रुपये ओतले आहेत —

**कादरखान** : आणि मीं याच्या घशांत पांच हजार रुपये घातले आहेत !

**माणिक** : ख्रिस्ती होऊन यांनीं माझ्याशीं लग्न लावायचं कबूल केलें आहे !

**कादरखान** : आणि मुसलमान होऊन यांनीं आमच्या विड्यांच्या कारखान्याचे मॅनेजर व्हायचं कबूल केलं आहे !

**माणिक**: काय हो, हे म्हणतात तें खरं आहे का ?

**कादरखान** : काय हो, या म्हणतात तें खरं आहे का ?

**त्रिभुवन** : परमेश्वरानं मला एक तोंड दिलं आहे ! दोघांना एकदम उत्तरं तरी कशीं देऊं ?

**कादरखान** : एकाचीं दोन तोंडं करण्याचं सामर्थ्य आहे माझ्यांत !

**माणिक** : एका तोंडानं इतकं खोटं बोलतात, मग दोन तोंडं झाल्यावर किती बोलतील !

**कादरखान** : टाक माझे पैसे, नाहींतर मुसलमान हो —

**माणिक** : टाक माझे पैसे, नाहीं तर ख्रिस्ती हो —

**त्रिभुवन** : आपल्याजवळ एक कवडी नाहीं ! कां उगीच छळतां मला !

**कादरखान** : मग मुसलमान हो —

**त्रिभुवन** : पण मीं नाहीं कुठं म्हटलं आहे ?

**माणिक** : काय म्हणालांत ! ख्रिस्ती झालं पाहिजे तुम्ही —

**त्रिभुवन** : होतों – ख्रिस्ती होतों ! मीं नाहीं म्हटलं आहे का !

**कादरखान** : कसा ख्रिस्ती होतों तें बघतों. (मारूं लागतो.) खिमा करीन –बिऱ्यानी बनवीन !

**माणिक** : कसा मुसलमान होतों तें मी पाहतें !

**त्रिभुवन** : हो – हो – होतों – होतों – मुसलमान होतों – ख्रिस्ती होतों – दोन्ही एकदम होतों; पण मारूं नका – मेलों –

[ इतक्यांत दिलीप व कांहीं स्वयंसेवक येतात.

**दिलीप** : कां या बिचाऱ्या धर्मांतरवाद्यांचा छळ मांडला आहांत ? सोडा त्याला !

**माणिक** : पांचशें रुपये घेऊन आतां हे ख्रिस्ती होत नाहींत !

**कादरखान** : पांच हजार रुपये घेऊन आतां हा मुसलमान होत नाहीं !

**दिलीप** : हें पहा, तुम्ही तिघेही महामूर्ख आहांत ! धर्माचा खेळखंडोबा मांडला आहांत तुम्हीं सर्वांनीं ! धर्म ही काय पैसे देऊन खरेदी करण्याची बाजारी वस्तु आहे ? धर्माचा लिलांव मांडणारा हा एकपट गाढव, तर स्वतःच्या फायद्यासाठीं तो खरेदी करणारे तुम्ही दसपट गाढव !

**माणिक** : पण आमचे पैसे —

**दिलीप** : अक्कल शिकायला एवढी किंमत कांहीं फार नाहीं ! पैसे गेले तर जाऊं द्यात, पण धर्माची विटंबना तरी आतां पुरे करा.

**त्रिभुवन** : तेंच तर मी आतां यांना सांगतोंय् !

**कादरखान** : मी व्यापारी आहें ! मी पैसा बुडवतोंय् ! कबरस्थानांत जाऊन पैसे वसूल करीन याच्याकडून ! निमकहराम—

[ त्रिभुवनच्या अंगावर धांवतो. तो पळून जातो. कादरखान त्याच्या मागून जातो.

**माणिक** : मी आतां काय करूं ! मी यांच्या मागें कुठें धांवूं ? पैसे गेले आणि अब्रूपरी अब्रू गेली. हें काळें तोंड घेऊन आतां कुठं जाऊं ? स्वतःच्या धर्मांतल्या माणसाच्या उपदेशाकडे दुर्लक्ष करून मी यांच्या पाठीमागें लागलें आणि स्वतःचा नाश करून घेतला ! आतां ते लोक मला पायरीशीं तरी उभे करतील का ? आत्महत्त्या केल्याशिवाय आतां दुसरा मार्गच नाहीं !

**दिलीप** : अगदीं वेडी आहेस तूं ! अनाथाचा आसरा, दलितांचा निवारा, अस्पृश्यांचा उबारा असा हिंदुधर्म आपले हजारों बाहु पसरून तुला परत आपल्या हृदयाशीं कवटाळायला तयार असतांना तुला मरण्याचा विचार करण्याचें काय कारण ?

जगिं न दुसरा, धर्म खरा ! निज लेंकरा हा आसरा !
पतित मनाला एक उबारा, चुकल्या जीवा हाच निवारा !
नेई पैलतीरा !

**माणिक** : तुमच्या पावलावर पाऊल टाकून येण्याची माझी तयारी आहे.

**दिलीप** : हिंदुधर्म आक्रोश करून आपल्या चुकलेल्या लेकरांना आज बोलावतो आहे ! या तुझ्या आईच्या हांका तुला ऐकूं येत नाहींत ? हिंदुधर्माच्या सामर्थ्यासाठीं, हिंदुस्थानच्या कल्याणासाठीं स्वतःच्या प्राणाची जर तूं आहुति देशील तर तुझ्या मरणाला मोल येईल ! चल माझ्याबरोबर ! आज तुझ्या सहाय्याची, तुझ्या बलाची, हिंदुधर्माला आवश्यकता आहे ! अशी वेळ पुन्हां चालून येणार नाहीं !

[ सारे जातात.

# [ ३ ]

कोटेश्वराचें मंदिर. मंदिरासमोर पोलिस व अधिकारी उभे आहेत. कांहीं वर्तमानपत्रांचे बातमीदार असून लोकांची गर्दीही हळूहळूं जमत आहे.

**१ पोलिस** : बाजूला व्हा – मागें सरा – गर्दी करूं नका—

**२ पोलिस** : ( कोणाला तरी ) तुमचं काय काम आहे इथं ? तुरुंगांत जायचंय् का ?

**कोणी तरी** : होय, जायचंय् —

[ लोक हंसतात.

**१ पोलिस** : काय हंसताय् काय ? दांत फुटतील तेव्हां कळेल – ( कोणी तरी बँडबाजा वाजवतें. ) खामोष ! अहो, तें बंद करा !

**गृहस्थ** : मंदिरप्रवेशाची बंदी आहे इथं, म्हणून हें वाजवायची बंदी थोडीच आहे !

**१ पोलिस** : मग वाजवा ! दोन्ही हातांनीं वाजवा !

**१ बातमीदार** : हें सत्याग्रहाचें पथक आतां येणार आहे तरी केव्हां ? उभं राहून राहून कंटाळा आला ! आणि आमच्या संपादकानं सांगितलं कीं सर्वांच्या आधीं तुमची बातमी आली पाहिजे.

**२ बातमीदार** : माझी तर आमच्या पत्रानें या मंदिरप्रवेशसत्याग्रहाचा स्पेशल बातमीदार म्हणून नेमणूक केली आहे. आज चार दिवस झाले. इथं

येतों न् त्या शेजारच्या पानपट्टीच्या दुकानांत बसतों गप्पा मारीत! झकास आहे काम! सत्याग्रह होवो वा न होवो — आपल्याला काय! जरा गमतींत वेळ गेला म्हणजे बस!

[एक तरुण प्रवेश करतो व पुढें जाऊं लागतो.

**पोलीस :** ए, कुठं चाललास? तुला प्रवेशबंदीचा हुकूम माहीत आहे ना?

**तरुण :** मी – मी – ब – ब – बातमीदार आहें.

**१ पोलीस :** चल निघ – म्हणे बातमीदार आहें. (त्याला गचांडी देतो. तो मागल्यामागें जातो.) कुठलीं कार्टी येतात आणि म्हणतात मी बातमीदार आहें! असं बातमीदारांचं पेव फुटलंय हल्लीं!

**१ बातमीदार :** अहो, तो खरंच आमच्या त्या ह्या पत्राचा बातमीदार आहे. तुम्ही त्याच्या अंगाला हात लावला आहांत – आम्ही तुमचा वर्तमानपत्रांत निषेध करूं —

**२ पोलीस :** आम्हांला काय ठाऊक बातमीदार आहे का कोण आहे? टाळक्याला पाट्या तरी लावून येत जा!

[वर्तमानपत्र विकणारा पोऱ्या ओरडत येतो.

**मुलगा :** जादा अंक 'दुष्काळ'! कोटेश्वराच्या मंदिरापुढें हजारों लोकांची गर्दी. सत्याग्रहाचा धुमधडाका! दोन चेंगरले. चार चिरडले. अर्धा आणा– 'दुष्काळ!'

[जातो.

**१ प्रेक्षक :** काय बेधडक खोटं छापतात हे! कशाला कांहीं पत्ता नाहीं इथं, आणि म्हणे हजारों लोकांची गर्दी!

**२ प्रेक्षक :** कां हो, या सत्याग्रह्यांचा तर ठिकाण नाहीं! आपण तरी करूं या सुरवात!

**१ प्रेक्षक :** छे बुवा! आमची मंडळी घरीं आहेत बाळंत. सध्यां तरी तुरुंगांत जायची आपल्याला सवड नाहीं!

**२ प्रेक्षक :** वर्तमानपत्रांत नांव तरी छापून येईल! नाहींतर आम्ही मेलों तरी आमचं नांव कोणी छापायचं नाहीं!

[एक वृद्ध गृहस्थ प्रवेश करतात व देवळाकडे जाऊं लागतात.

**१ पोलीस** : अहो, चाललांत कुठं ! तुम्हाला कायदा माहीत आहे ना !

**वृद्ध** : (खणखणीत आवाजांत) होय, मला कायदा माहीत आहे आणि कायदेभंग करण्यासाठींच मी इथं इतक्या लांबून आलों आहें. समजलांत ! (लोकांत खळबळ.) इथं वर्तमानपत्राचे कोणी बातमीदार आहेत ? (बातमीदार पुढें होतात.) अस्सं, तुम्हीं बातमीदार ! घ्या माझं नांव टिपून ! खंडो पिलाजी टिल्लू ! राहणार अवसरी बुद्रुक, तालुका खेड, जिल्हा पुणें. हंसताय् काय ? हिंदु धर्माचा कट्टा अभिमानी आहें मी ! तुमच्या शहरांतल्यासारखा बारगळलों नाहीं मी ! सत्याग्रहांत भाग घेण्यासाठीं पायीं चालत आलों आहे इतक्या लांब ! बरं, तुमचं तें फोटो काढायचं यंत्र कुठं आहे ? —

**१ बातमीदार** : कां ?

**वृद्ध** : माझा फोटो काढून घ्या ताबडतोब म्हणजे कायदेभंग करायला बरं — आणि (खिशांतून एक चिठी काढतो.) हा माझा संदेश ! सगळाच्या सगळा छापा — एक अक्षरही गाळूं नका —

**१ बातमीदार** : (चिठी चुरगळून फेंकून देतो.) काय वेड लागलंय् काय तुम्हाला म्हातारबुवा ? संदेश काय देतां आणि फोटो काढा काय म्हणतां !

**२ पोलीस** : अहो, तुम्हांला कायदेभंग करायचा असेल तर ताबडतोब करा ! गप्पा मारीत बसूं नका — आटपा लौकर ! आम्हांला कांहीं तरी कामागिरी मिळूं द्या.

**वृद्ध** : फोटोही घेत नाहींत आणि संदेशही छापीत नाहींत ! मग लागेना आग तुमच्या त्या सत्याग्रहाला अन् कायदेभंगाला ! मी खेडेगांवचा माणूस आहें — असा फसायचा नाहीं तुम्हां शहरी लोकांना !

[ जातो. आंतून ‘ इन्क्विलाब झिंदाबाद, ’ ‘ भारतमातेचा जयजयकार, ’ ‘ हिंदुधर्माचा जयजयकार ’ अशा आरोळ्या ऐकूं येतात. पोलिस एकदम सावधपणानें उभे रहातात. लोकांत खळबळ उडते. इतक्यांत तिरंगी राष्ट्रध्वज पुढें असलेली लोकपक्षीय स्वयंसेवकांची मिरवणूक येते. आघाडीला दिलीप व माणिक आहे. माणिकचे कपाळावर कुंकू दिसत आहे. पुन्हां एकदां जयजयकार होतो.

**दिलीप** : माझ्या देशबंधूंनो आणि धर्मबंधूंनो, आपल्या पवित्र हिंदुधर्माच्या पुनरुज्जीवनासाठीं, आतां सुरू होणाऱ्या अनत्याचारी धर्मयुद्धांत भाग घेण्या-

साठीं मी तुम्हांला जाहीर आवाहन देतों. तुमच्या पराक्रमाची ही खरी कसोटी आहे. जातिभेद हें हिंदुधर्माच्या अंगांत भिनलेलें विष आहे, तर अस्पृश्यता हा तेजस्वी हिंदु धर्मावरील एक भीषण कलंक आहे. अस्पृश्यतेचें आणि जातिभेदाचें उच्छेदन केलें, तरच हिंदुधर्म पूर्वीप्रमाणें सामर्थ्यवान् होईल. आणि यच्चयावत् हिंदु सामर्थ्यवान् व तेजस्वी झाला, तरच आपली मातृभूमि स्वतंत्र होईल ! माणुसकीच्या हक्काला हजारों वर्षें मुकलेले तुमचे सात कोटी धर्मबांधव, तुमच्या राक्षसी वृत्तीला कंटाळून, तुमच्या धर्मावर लाथ मारून, आज दुसऱ्या धर्मात चालले आहेत. त्यांना तुम्ही तसेच जाऊं देणार ? ( 'नाहीं – नाहीं –' अशा आरोळ्या येतात. ) मग माणुसकीचे सारे हक्क त्यांना एकदम देऊन टाका ! त्यांना आपल्या धर्मातून जाऊं देऊं नका ! हिंदूंचें संख्याबल आणि तेहतीस कोटी हिंदूंचा हिंदुस्थान जगाला दाखवा ! ( 'हिंदुधर्माचा जयजयकार' अशा आरोळ्या ) मला आपल्याला सांगायला अतिशय आनंद वाटतो कीं पूर्वी परधर्मात गेलेल्या आपल्या या भगिनी आजच्या या मुहूर्तावर परत हिंदुधर्मात प्रविष्ट झाल्या आहेत ! ( माणिकला पुढें करतो. टाळ्या व जयजयकार ) इथं जमलेल्या माझ्या अस्पृश्य बंधूंनो, चला या, पुढें या, अस्पृश्यता आज नाहींशी झाली हें जाहीर करण्यासाठीं हातांत हात घालून आणि अन्यायी कायद्यांचा भंग करून आपण या मंदिरांत शिरूं या ! नाहीं कोणी अस्पृश्य बंधु पुढें येत ?

[ इतक्यांत त्रिभुवन धांवत येतो. त्याच्यामागें कादरखान आहे.

**त्रिभुवन** : थांबा – थांबा – मी आलों ! मला येऊं द्या ! मी तुमच्याबरोबर कायदेभंग करायला तयार आहें !

**कादरखान** : अडवा – अडवा त्याला ! पक्का डांबीस आहे तो—

**दिलीप** : कोण त्रिभुवन ! तुम्ही धर्मांतरवादी आणि—

**त्रिभुवन** : नाहीं – मी धर्मांतरवादी नाहीं ! कधींच नव्हतों ! लोकांचा गैरसमज झालाय् ! हिंदु धर्मासारखा धर्म नाहीं जगांत – चला शिरा आंत !

**कादरखान** : पांच हजार रुपये घेऊन आमच्या धर्मात यायचं कबूल केलं आहे. आणि आतां मला फसवून पैसे बुडविण्यासाठीं म्हणून हा हिंदूंचे देवळांत शिरतो आहे ! हिंदु धर्माचा हा कट्टा शत्रु आहे ! त्यापेक्षां मी तरी फार बरा ! मी याला सोडणार नाहीं !

**त्रिभुवन :** आतां माझ्या अंगाला हात लावायची काय तुझी छाती आहे ! मी देवळाच्या या पवित्र भूमीवर आतां उभा आहे आणि माझे शेंकडो हिंदु धर्मबांधव माझ्या संरक्षणाला येथें उभे आहेत ! ठिकऱ्या करून टाकतील तुझ्या ! म्हणे पांच हजार रुपये घेतले ! पांच हजार रुपयांच्या गमज्या नकोत ! मी सत्याग्रह करून आतां तुरुंगांत गेलों तर माझे हे धर्मबंधु इथल्या इथं वर्गणी करून पांच हजार रुपये तुझ्या तोंडावर फेकतील !

**१ पोलीस :** अहो, ही देण्याघेण्याची चर्चा बंद करा. कायदेभंग करणार आहांत काय ?

**त्रिभुवन :** म्हणजे शंका आहे का ?

**१ पोलीस :** (कादरखानाला) तुम्ही मागें सरा ! का तुम्हांला देवळांत शिरून कायदेभंग करायचाय् ?

**कादरखान :** छेः छेः, हिंदु देवळांत मी कसा शिरेन ? हिंदु धर्मासंबंधीं मला आदर आहे. त्यांच्या धार्मिक बाबतींत मला पडण्याचं कांहींच कारण नाहीं ! पण मला सांगायचं एवढंच, कीं हा माणूस बदमाष आहे.

**दिलीप :** बदमाष असला तरी तो हिंदु आहे. परधर्मीय महात्म्यापेक्षां बदमाष हिंदु आम्हांला अधिक जवळचा आहे ! कोणत्या का हेतूनें होईना, हा धर्मांतरवादी मनुष्य स्वधर्मांत राहिला हा आमच्या धर्माचा मोठा विजय आहे. चला त्रिभुवन—

[ त्याच्या हातांत हात घालून देवळाच्या पायऱ्यांवर चढतो. लोकांचा जयघोष होतो.

**इन्स्पेक्टर :** कायदेभंग केल्याबद्दल मी तुम्हांला अटक करतों.

**दिलीप :** आम्ही आनंदानें तुमच्या स्वाधीन होतों.

[ 'दिलीप की जय ! हिंदुधर्म की जय ! वंदे भारतम्' च्या गर्जना. 'धर्मांतरवादी की जय !' आणि हंशा ! कोणी तरी त्यांच्या गळ्यांत हार घालतात.

**इन्स्पेक्टर :** नाईक, यांना पलीकडच्या मोटारींत नेऊन बसवा—

[ नाईक दिलीप व त्रिभुवन यांना नेऊं लागतात; तोंच अलका धांवत येते.

**अलका :** थांबा — थांबा दिलीप, मला येऊं द्या. मला घेतल्यावांचून कसे चाललांत तुम्ही ?

**दिलीप** : अलका – तूं आलीस ! अहाहा, आतां मात्र मी धन्य झालों – मीं पलिकडे तुझी वाट पहात आहें ! ये माझ्या मागून—

[ नाईक त्यांना घेऊन जातो.

**अलका** : ( पोलिस इन्स्पेक्टरास ) आटपा, मला अटक करा – मला त्यांच्या-बरोबर जाऊं द्या—

**१ बातमीदार** : थांबा, मला तुमचा फोटो घेऊं द्या ! ( फोटो घेतो. ) थँक यू.

**२ बातमीदार** : अरे, ही मुख्य प्रधानांची मुलगी – वर्तमानपत्रांना जंगी बातमी !

**माणिक** : मलाही अटक करा, मी यांच्याबरोबर जायला तयार आहें !

**१ बातमीदार** : ( माणिकचा फोटो घेत ) थँक यू !

**इन्स्पेक्टर** : बायकांना अटक करण्याचा आम्हांला हुकूम नाहीं ! तुम्ही देवळांत जाऊन वाती कां वळीत बसानात !

**अलका** : काय बायकांना अटक करणार नाहीं तुम्ही ? आम्ही पुरुषांच्या खांद्याला खांदा देऊन लढणाऱ्या बायका आहोंत ! या बघणाऱ्या लोकांसारख्या आम्हीं बांगड्या भरल्या नाहींत हातांत ! ( त्याचा हात पकडते. ) तुम्हीं आम्हांला अटक केली पाहिजे—

**माणिक** : ( त्याचा दुसरा हात पकडत ) तुम्ही आम्हांला अटक केलीच पाहिजे ! अटक केली नाहीं तर बघा !

[ लोक 'पोलिस इन्स्पेक्टर की जय' म्हणून ओरडतात.

**इन्स्पेक्टर** : मी तुम्हांला अटक करीत नाहीं म्हणून तुम्ही मला अटक करीत आहांत कीं काय ? बायांनो, माझे हात सोडा आणि बाजूला व्हा ! माझा विनयभंग होतो आहे हा !

[ बातमीदार त्या दृश्याचे फोटो घेतात. इतक्यांत सोमेश्वर येतो.

**सोमेश्वर** : हा कायदेभंग चाललाय् का तिरंगी सामना चाललाय् ? कायहो अधिकारी, ही कामगिरी करतां होय इथं ! आमच्या देवळासमोर आणि हा प्रकार ! पोलिस आहांत का कोण आहांत ! चला व्हा बाजूला !

**इन्स्पेक्टर** : ( त्याला अडवून ) अहो, चाललांत कुठं ? कोण तुम्ही ?

**सोमेश्वर :** मी कोण ? वर मलाच विचारतां काय ? मी कोण दिसत नाहीं ? का धुंदी चढली आहे डोळ्यावर ? मी या देवळाचा मालक आहें ! मला देवळांत जायला अडवतां काय ?

**कादरखान :** मी सांगतों, हे देवळाचे मालक आहेत — या समोरच्या जागेचा मालक मात्र मी आहें !

**इन्स्पेक्टर :** मालक बिलक आम्ही ओळखत नाहीं ! कायदा म्हणजे सब घोडे बारा टक्के ! तुम्ही ही हद्द ओलांडून कायदेभंग केला आहेत ! आम्हीं तुम्हांला अटक केली आहे ! नाईक, न्या यांना पलीकडच्या मोटारींत.

[ नाईक त्यांना पकडतो.

**१ बातमीदार :** तुमचा संदेश सांगा—

**सोमेश्वर :** टाळकं फोडीन ! संदेश मागतोय् लेकाचा ! माझ्या देवळासमोर मला अटक ! ( नाइकास ) बाजूला हो — मी पवित्र ब्राह्मण आहें — अंगाला हात लावशील तर शापून भस्म करीन—

**इन्स्पेक्टर :** ( ओरडून ) जास्ती गडबड करूं नका ! गप्प बसा !

**सोमेश्वर :** नाहीं, पण हा जुलूम आहे ! माझ्या देवळांत जायची मला बंदी ! हा अन्याय आहे ! हा माझा अपमान आहे !

**अलका :** तुमच्या देवळांत जायची क्षणभर तुम्हांला बंदी केली तर तुम्हांला ती सहन होत नाहीं आणि स्वतःच्या धर्माच्या देवळांत जाण्याची केलेली बंदी हजारों वर्षें तुमच्या अस्पृश्यबांधवांनीं कशी सहन केली असेल ?

**सोमेश्वर :** तुम्ही काय बोलतां तें एकदम पटलं ! मला देवळांत जायची बंदी करतां तर साऱ्यांनाच देऊळ खुलें करून टाकतों ! या, बघतां काय ? शिरा देवळांत ! या देवळाचा मालक मी तुम्हांला टाहो फोडून सांगतों आहें.

[ ‘ हिंदुधर्म की जय ’च्या आरोळ्या. इतक्यांत एक पोलिस शिपाई घाईघाईनें येतो व इन्स्पेक्टरच्या हातीं एक सरकारी पत्र देतो. इन्स्पेक्टर तें वाचतो.

**इन्स्पेक्टर :** लोकहो, थांबा, गडबड करूं नका ! हा इतक्यांत आलेला महत्त्वाचा सरकारी हुकूम मी जाहीर करतों. जुन्या मंत्रिमंडळानें आतांच राजिनामा दिलेला असून राजिनामा देण्यापूर्वी त्यांनीं प्रवेशबंदीचा हुकूम

मार्गे घेतला आहे. ( लोक ' लोकपक्षकी जय ' – ' इन्किलाब झिंदाबाद ' ओरडतात ) आमची कामगिरी संपली ! आतां कोणीही खुशाल देवळांत गेलां तरी आमची हरकत नाहीं !

**सोमेश्वर** : तुम्ही कोण सांगणार हरकत नाहीं म्हणून ! माझं देऊळ मीं लोकांना उघडं केलं आहे. मला बंदी करतांय ! अशी कायद्याची भंबेरी उडवली ! देऊळ खुलं करून टाकलं, तेव्हां कायदा मागं घेतला झक मारीत !

**इन्स्पेक्टर** : नाईक, त्या मोटारींतल्या मंडळींना सोडून द्या ! चला सगळे !

[ इन्स्पेक्टर, पोलिससहित रांगेनें जातात. लोक ' क्विक् मार्च ' ओरडतात. कल्याण जयंतीला घेऊन घाईघाईनें प्रवेश करतो.

**कल्याण** : अरे, ए थांबा, थांबा, अहो पोलिस – चाललांत कुठं ? म्हणजे आम्ही सत्याग्रह करायला आलों आणि हे कुठं चालले ?

**अलका** : प्रवेशबंदीचा हुकूम उठला ! सत्याग्रहाचा विजय झाला !

**कल्याण** : काय सत्याग्रह संपला ! हात्तिच्या ! ( जयंतीस ) पाहिलंस – आपण वाटेंत प्रेमाच्या गप्पा करीत बसलों आणि तुरुंगांत जाण्याची चालत आलेली पर्वणी हातची गेली !

**सोमेश्वर** : म्हणजे कल्याण का हा ? काय रे ए, खुशाल या पोरीचा हात धरून राजरोसपणें इथं आलास ! मी तुझा बाप इथं आहें ! कांहीं लाज वाटते आहे का ?

**कल्याण** : मग स्वतःच्या बायकोचा हात धरून हिंडायला कोणाच्या बापाची भीति आहे !

**सोमेश्वर** : कोण, ही तुझी बायको ! बेशरम—

**कल्याण** : म्हणजे यांत शंका आहे कीं काय ! जयंती, हे तुझे सासरे, पड यांच्या पायां—

[ जयंती पाया पडावयास लागते.

**सोमेश्वर** : चल हो दूर !

**अलका** : अहो, आशीर्वाद द्या आपल्या सुनेला ! असं काय करतां ?

**सोमेश्वर** : कुठली कोण महारीण आणली आणि म्हणे आशीर्वाद द्या !

**कल्याण** : ( जयंतीस ) बघ. मीं तुला काय सांगितलं होतं? तुला पाहिल्याबरोबर बाबांनीं तुझी जात ओळखली!

**सोमेश्वर** : म्हणजे काय बोलतोस काय! महाराची आहे काय ही?

[ दिलीप व त्रिभुवन येतात.

**कल्याण** : अर्थातच! या आपल्या त्रिभुवनची बहीण—

**सोमेश्वर** : छेः छेः; आतां कडेलोट झाला! सनातनधर्माचा निकाल लागला! ब्राह्मण्याला भडाग्नि मिळाला. पुढच्या बेचाळीस पिढ्या या कार्ट्यानें रौरवांत ढकलल्या! हरामखोरा—

[ कल्याणच्या अंगावर धांवून जातो.

**दिलीप** : अहो, अहो, काय हें! अस्पृश्यांना आपलं देऊळ तुम्हीं खुलं केलंत आणि आतां घराचे दरवाजे बंद करतां! यापुढें आतां जाति संपल्या. कोणी ब्राह्मण नाहीं आणि कोणी महार नाहीं. जाति मारल्याशिवाय धर्म जगणार नाहीं!

**सोमेश्वर** : नाहीं पण, मी म्हणतों तूं वाटेल तें कर. इराण्याच्या हॉटेलांत जा, मांस खा – मच्छी खा, दारू पी – पण महाराच्या मुलीशीं लग्न! लग्न न करतांना नुसती ठेव हिला हवी तर!

**त्रिभुवन** : ( चिडून ) अहो, माझ्या बहिणीसंबंधीं बोलतांहांत! तोंड सांभाळून बोला—

**दिलीप** : सोमेश्वर,' तुम्हीं हिंदुधर्माचे कट्टे अभिमानी आहांत – हिंदु धर्म जगून सामर्थ्यवान व्हावा अशी तुमची इच्छा आहे ना? ब्राह्मण आणि महार हीं हिंदु समाजाचीं दोन टोकें आहेत. अशा विवाहानें तीं घट्ट बांधून ठेवल्याशिवाय विस्कळित झालेला हिंदुसमाज कधींही संघटित होणार नाहीं! हिंदुधर्माच्या पुनरुज्जीवनाचा हा पराक्रमी आरंभ तुमच्या पुत्रानें केला याबद्दल हिंदुधर्माच्या इतिहासांत याचं नांव अजरामर होईल! असला धर्मवीर पुत्र लाभला याबद्दल धन्यता माना!

**सोमेश्वर** : धर्मवीर! हा धर्मवीर! हा धर्मवीर कसला, हा धर्मचीर आहे!

**अलका** : पण कांहीं असलं तरी तुमच्या मुलानं परधर्मी मुलीशीं तर लग्न

केलं नाहीं ! चांगल्या सुशिक्षित हिंदु मुलीशींच विवाह केला हें काय कमी आहे ?

**सोमेश्वर** : हें मात्र कबूल – उद्यां यानं विलायतेंतील गोरी महारीण आणली असती तर काय घ्या ! त्यापेक्षां आपल्या रंगाची काळी महारीण पत्करली ! बाकी तशी ही मुलगी दिसायला कांहीं वाईट नाहीं !

**दिलीप** : तेंच म्हणतों मी ! जयंती, पड यांच्या पायां ! द्या, सोमेश्वर, तुमचा हिंदुधर्माचा अभिमान जागा करून तुमच्या सुनेला आशीर्वाद द्या ! हिंदुधर्माची सेवा करणारे आठ सुपुत्र यांना होवोत असा आशीर्वाद द्या !

**सोमेश्वर** : अहो, काय सांगतां काय तुम्ही ? अस्पृश्यांना माझं देऊळ मी खुलं केलं हे मोठे उपकार समजा ! आतां उद्यां त्यांच्या पोरांना हातावर खेळवत बसून माझ्या घरादाराची भोकरवाडी करूं काय ?

[ खादीची टोपी घातलेले सर गुरुनाथ प्रवेश करतात.

**अलका** : कोण, बाबा—

[ आनंदानें त्यांच्याकडे धांवत जाते. 'लोकपक्ष की जय' असें लोक ओरडतात.

**गुरुनाथ** : द्या द्या – सोमेश्वर, आपल्या सुनेला आशीर्वाद द्या ! मीं माझ्या तीस वर्षांच्या राजकारणाचा अभिमान सोडला आणि काळाच्या प्रवाहाला येऊन मिळालों ! काळ हा सर्वांत मोठा सुधारक आहे ! तुम्ही किती जुन्याचा अभिमान धराल ? काळ तुम्हाआम्हांला आपल्या इच्छेविरुद्ध कोठल्या कोठें फरफटत नेतो आहे ! काळाच्या या शर्यतींत जो मागें पडेल त्याचें जगांत हंसें होईल ! आपण जुनी मंडळी, बाळगोपाळाचा हट्ट आपण पुरवणार नाहीं तर कोण पुरवणार ?

**सोमेश्वर** : रास्त बोललांत ! बालगोपाळांचा हट्ट पुरवावा आपणच ! द्या टाळी ! ही – ही नवीन मंडळी काय हात धरणार आपला या बाबतींत ! यांना मुलं होऊं द्यात म्हणजे कळेल ! आपण जुनी मंडळी आपल्या पोरांना जेवढ्या सवलती अन् मोकळिकी देत होतों त्याच्या एक सहस्रांश जरी यांनीं आपल्या पोरांना दिल्या तरी मिळवली ! आजपर्यंत हजारों वर्षें आम्हीं सनातनी मंडळींनीं आपले प्राण देऊन धर्माचें रक्षण केलें आहे; त्याच धर्माच्या रक्षणासाठीं आज

एवढा आत्यंतिक त्याग करावयाला आम्ही तयार झालों आहोंत हें लक्षांत ठेवा. ( जयंतीस ) चल ग, ये पुढें ! मुली, माझा म्हाताऱ्याचा एक उपदेश ऐक ! हें कार्टे माझ्या आतांपर्यंतच्या हयातींत तरी कांहीं धर्माप्रमाणं वागलं नाहीं ! तर याचा कान पिरगाळून याला ताळ्यावर आण ! रोज या मंदिरांत त्याला सकाळसंध्याकाळ दर्शनाला आण आणि काय वाटेल तें करा पण, ( डोळ्यांतले अश्रु उपरण्यानें पुशीत गहिंवरून ) हिंदु म्हणून जगा आणि हिंदु म्हणून मरा ! ( जयंती पायां पडते ) अष्टपुत्रा सौभाग्यवती भव !

[ ' हिंदुधर्म की जय ' अशा आरोळ्या. इतक्यांत खादीच्या पोषाखांत सदानंद हातांत हस्तपत्रकांचा जुडगा घेऊन येतो व आल्याबरोबर लोकांना वांटूं लागतो.

**गुरुनाथ** : कोण, सदानंद—

**सदानंद** : हें घ्या – हें वाचा ! विचारूं नका ! अगोदर वाचा—

**त्रिभुवन** : म्हणजे, काय रे ? या कसल्या नाटकाच्या जाहिराती वांटतोस ?

**सदानंद** : या नाटकाच्या जाहिराती नसून हा माझा जाहीरनामा आहे ! शेतकरी व ब्राह्मणेतर पक्षाचा राजिनामा देऊन आम्ही आतां लोकपक्षाला मिळालों ! बंधूंनो, स्वातंत्र्याच्या झगड्यासाठीं आपणही सर्व लोकपक्षाला मिळावें अशी आमची तुम्हांला नम्र विनंति आहे.

**त्रिभुवन** : काय डांबीस आहे हा ! आजपर्यंत वाहत्या गंगेंत हात धुऊन घेतला आणि आतां साळसूदपणें खादीचा अभ्रा अडकवून लोकपक्षाला मिळालास होय ! शिव्या देऊन भागला नि देशसेवेला लागला !

**कादरखान** : याच्या डोक्यावर ही पांढरी टोपी नसती तर याचं टाळकं मीं इथल्याइथं सडकलं असतं ! यांनीं या जागेची भानगड माझ्या डोक्यांत घातली; नाहीं तर कशाला मी भांडलों असतों या सोमेश्वराशीं ! तसे ते आमचे दोस्त आहेत.

**सदानंद** : आतां कशाला मागलं काढतांय ! मागला इतिहासच काढला तर कोण लेकाचा साधु ठरणार आहे ! आणि तुमच्या पायाखालीं काय ज़ळतं आहे ?

**त्रिभुवन** : मला आतां खरोखरच पश्चात्ताप झाला आहे. मी कांहीं प्रामाणिक धर्मांतरवादी नव्हतों. खरे धर्मांतरवादी निराळे आहेत. ते कोठल्याही मोहाला व लोभाला बळी पडणारे नाहींत. धर्मांतराच्या या दंगलींत स्वतःचा स्वार्थ साधण्याच्या हेतूनें मी सामील झालों आणि एवढ्या भानगडी केल्या.

**सदानंद** : तुम्हांला पश्चात्ताप झाला तसा आम्हांला पश्चात्ताप होणें शक्य नाहीं काय ?

**दिलीप** : शांत व्हा ! मागलं गेलं, गंगेत मिळालं ! कोणी कसा का असेना ! जो आपल्यांत मिळाला, तो आपलाच असं आपण मानायला पाहिजे ! सदानंद, इतक्या उशिरां कां होईना, तुम्हीं आमच्या पक्षाला मिळाला, याबद्दल आम्ही तुमचं अभिनंदन करतों.

**गुरुनाथ** : तुम्ही दुसऱ्यांचीं अभिनंदन करीत सुटलांत पण तुमचं कोण अभिनंदन करणार ? दिलीप, तुमच्यासारखे त्यागी व चारित्र्यवान् राष्ट्रसेवक, धर्मसेवक आणि समाजसेवक ज्या देशांत आहेत त्याचा भविष्यकाळ अत्यंत उज्ज्वल आहे यांत शंका नाहीं ! कोणत्याही फळाच्या आशेनें तुम्हीं देशसेवा करीत नसलां, तरी तुमच्या कर्तबगारीचें कौतुक करणें, हें आमच्यासारख्या वृद्धांचें कर्तव्य आहे. अलका, इकडे ये, ( तिचा हात दिलीपच्या हातांत देतो. ) हें तुमच्या कार्याचें पारितोषिक ! आहे ना पसंत ? तसे चतुर्भुज झाला नाहींत तरी असे तरी चतुर्भुज व्हा !

**दिलीप** : मी आपला ऋणी आहें ! पण माझ्याबरोबर सत्याग्रहांत प्रथम सामील झालेल्या या माझ्या मित्रालाही चतुर्भुज करणें भाग आहे ! ( माणिकचा हात त्रिभुवनच्या हातांत देऊन ) हा हिंदुधर्माचा खरा विजय आहे. सोमेश्वर, यच्चयावत् हिंदूंना तुम्हीं मोकळें केलेलें हें कोटेश्वरचें देऊळ यापुढें ' पतितपावन मंदिर ' या नांवानें ओळखलें जावें, आणि या देवळाचा उद्घाटनसमारंभ आणि नामकरण समारंभ आजच्या या मंगल मुहूर्तावर, सरसाहेबांच्या हस्तेंच पार पाडावा अशी माझी इच्छा आहे !

**सोमेश्वर** : अत्युत्तम कल्पना ! चला, आतांचे आतां करून टाका !

**कल्याण** : थांबा, हें पतितपावन मंदिर सरसाहेबांच्या हस्तें उघडणार असलें तरी या मंदिरांत मीं सहकुटुंब प्रवेश केल्याशिवाय त्या नांवाला सार्थकता

येणार नाहीं ! तसं म्हणावं तर मी नव्यांतला जरी नवा असलों तरी जुन्याचाही पक्का अभिमानी आहें. आमच्या वडिलांचा अंश माझ्यांत आहे, नाहीं असं नाहीं ! म्हणून या मंदिरांत हिला घेऊन विधिपूर्वकच मी प्रवेश करणार ! जा ग, पंचारती घेऊन ये.

[ जयंती पंचारती घेऊन येते व कल्याण आपले कपडे चटकन् काढून आंतमध्यें आधींच नेसून आलेल्या शालजोडींत आणि पितांबरांत अवतीर्ण होतो.

**सोमेश्वर** : ( हंसून ) शाबास, आतां तूं खरा माझा पुत्र शोभतोस.

[ कल्याण व जयंती देवळांच्या पायऱ्या चढूं लागतात.

**दिलीप** : ह्याच हिंदुधर्माच्या वैभवाचा दिवस ! दलितांचा उद्धार हीच खरी देशाची आणि धर्माची सेवा ! आमचा धर्म सामर्थ्यवान् होवो व देश स्वतंत्र होवो हीच पतिपावन प्रभूच्या चरणापाशीं प्रार्थना आहे ! वंदे भारतम् ! हिंदुधर्म की जय !

[ लोकांत जयजयकार.

पडदा.

—: जय हिंद :—